# परलोक जीवन मृत्यु नंतर......




Argument for the Life Hereafter
a Chapter from "God Arises"

मराठी अनुवाद
ज. बा. शिम्पी, धुळे (महाराष्ट्र)

मौलाना वहीदुद्दीन खान

# NON-VIOLENCE AND PEACE-BUILDING

## IN ISLAM




For other details please contact:
www.goodwordbooks.com

---

ही पुस्तिका खालील पत्त्यावर मिळेल.

अब्दुस समद खलिल अहेमद

१०५०, रविवार पेठ, पुणे – ४११००२

फोन नं. : 020 24472830 मोबा. नं.: 9665059035

# परलोक जीवन मृत्यु नंतर......

Argument for the Life Hereafter
a Chapter from "God Arises"

मराठी अनुवाद
ज. बा. शिम्पी, धुळे (महाराष्ट्र)

मौलाना वहीदुद्दीन खान

मुल्य : ₹ २०.००

# मृत्युनंतरच्या जीवनासंबंधी चर्चा

धर्माबद्दलची महत्वाची तत्त्वप्रणाली म्हणजे मृत्युनंतरचे जीवन. मनुष्य मरण पावल्यानंतर ह्या सध्याच्या क्षणभंगुर जगास सोडून तो अंतिम न्यायदानाच्या दिवशी एका शाश्वत व चिरंतन अशा दुसऱ्या जगात प्रवेश करतो. सध्याचे विश्व पूर्वतयारीचे स्थान आहे, जेथे मानव आपले संपूर्ण जीवन परीक्षार्थी म्हणून, तात्पुरत्या ठिकाणी जगत असतो. जेव्हा जगाचा अंत येईल, तेव्हा ईश्वर हे जग नष्ट करुन आमुलाग्रपणे वेगळ्या पद्धतीचे दुसरे जग तयार करील. सर्व मानवांना पुन्हा एकदा जिवंत केले जाईल व सर्वशक्तीमान ईश्वरापुढे न्यायासाठी त्यांना उभे करण्यात येईल. त्यानंतर प्रत्येकाला पृथ्वीवर त्याने केलेल्या चांगल्या व वाईट कृत्यांना अनुसरुन योग्य ते बक्षिस दिले जाईल किंवा शिक्षासुद्धा केली जाईल.

ह्या संकल्पनेचा आपण आता वेगळ्या दृष्टीकोनातून विचार करुया. आणि ह्या शक्याशक्यतेच्या कसोटीवर घासून पाहून त्यावर विश्वास ठेवावयाचा किंवा कसे हे ठरवूया.

## शक्याशक्यता

सध्याच्या विश्वाच्या रचनेनुसार पहिलाच प्रश्न उद्भवतो की, मृत्युनंतर जीवन नावाची काही गोष्ट आहे काय? अशा काही घटना किंवा संकेत मिळतात काय की ज्याद्वारे त्यावर विश्वास ठेवावयाचा किंवा कसे? त्यास काही पुरावा मिळून पुष्टी मिळते का?

ह्या संकल्पनेतील पहिलीच गोष्ट पूर्वगृहित आहे, की सध्याच्या मानवाच्या व विश्वाच्या स्थितीवरून माणूस व विश्व हे चिरंतन आहे. कारण आपण सर्वजण हे नि:शंकपणे जाणतो की मानव व विश्व हे दोघेही नाशवंत आहेत.

जे दुसऱ्या जगावर विश्वास ठेवत नाहीत, त्यांना सध्याचे विश्वच सुखसमृद्धीने भरलेल्या स्वर्गाप्रमाणे व्हावे असे वाटत असते. त्यांची अशीच इच्छा असते. मृत्यु येण्याचे कारण अथवा कारणे काय असावीत याबाबत संशोधन केले जाते, त्याचा हेतू हाच की, त्याची कल्पना अगोदर मिळावी,

शक्य झालेतर त्याला थोपवून धरावे व माणसाला अमरत्व प्राप्त व्हावे. परंतु ह्या संशोधनाचे फलित अथांग पसरलेल्या सागराप्रमाणे अयशस्वी ठरले आहे. प्रत्येक अयशस्वी संशोधनानंतर, मृत्युपासून सुटका कशी होईल किंवा कशी करुन घेता येईल हा प्रश्न अधिकाधिक तीव्र होतो.

मृत्यु का येतो? याबाबत किमान २०० कारणे सांगता येतील. शरीरातील रासायनिक क्रिया मंदावून थांबणे, अवयव थकणे, रक्तवाहिन्या झिजत जाणे, पेशींची झीज होणे, आतड्यांमध्ये जीवाणुद्वारा शरीरभर वीष परसणे आणि अशीच बरीच कारणे सांगता येतील.

शरीराची झीज होणे ही संकल्पना बरीच योग्य वाटते. यंत्रे, जोडे, कपडे व असे दुसरेही पदार्थ कालांतराने झिजतात. त्याचप्रमाणे आमचे बाह्यात्कारी शरीर आता नाही तर नंतर कधीतरी – कपडे झिजावे तसे झिजून नष्ट होणार ही खात्रीची गोष्ट आहे. पण विज्ञान ह्या विचाराला अंशतः मान्यता देते, कारण मानवी शरीर हे यंत्रे, कापड, खडकाचा भाग यापेक्षा काही वेगळेच आहे.

त्याची तुलना एखाद्या नदीशी केली जाते, जी हजारो लाखो वर्षांपासून सतत वाहात असते आणि आजही वाहातच आहे. मग आपण खरोखर ती नदी फार म्हातारी किंवा तिच्यातील पाणी साठलेले आहे असे म्हणतो काय? अमेरिकन रसायनतज्ज्ञ व १९५४ मध्ये रसायनाचे व १९६२ मध्ये शांततेचे नोबेल पारितोषिक मिळविलेले डॉ. कॉर्ल लिनूस पौलिंग (Dr. Carl Linus Pauling) (जन्म १९०१) असे दाखवून देतो की, तात्त्विकदृष्ट्या, शाश्वत अशा साच्यात माणसाला घडविले गेले आहे व त्याच्या शरीरातील पेशी म्हणजे अशी यंत्रे आहेत, जी दोषांना (शरीरातील) स्वतःच शरीराबाहेर घालवून देतात. एवढे असूनसुद्धा माणसाचे वय वाढत नाही तर जसजशी वर्षे वाढतात, तसतसा तो मृत्युपंथी लागून मरण पावतो.

आपण क्षणभर मृत्युचाही विचार सोडून देऊ आणि फक्त जीवनाबद्दल विचार करू. आपले शरीर कायमचे अंतर्गतरित्या नूतन बनत असते. पेशीद्रव्यातील रेणूंचे पुनरुत्पादन होत असते, रेणू नष्ट होतात, पुन्हा तयार होतात. पेशीसुद्धा (नाडी पेशी सोडून) कायम नष्ट होत असतात व त्यांची जागा नव्या पेशी घेत असतात. असा अंदाज केला जातो की, माणसाच्या शरीरातील संपूर्ण रक्त हे चार महिन्यात नव्याने तयार होत असते; आणि

काही वर्षांत शरीरातील प्रत्येक अणुरेणू संपूर्णपणे बदलला जातो. असे दिसते की, मानव हा निव्वळ हाडे व रक्तामासांच्या गोळ्यापेक्षा, नदीप्रमाणेच आहे. थोडक्यात, मानवी शरीरात नेहमी प्रक्रिया चालू असतात. असे जर आहे तर शरीर थकते, म्हातारे होते ह्या संकल्पनांना कोणताही आधार नाही असे म्हटले पाहिजे. समजा, सर्वसाधारणपणे, मृत्युला अप्रत्यक्ष कारण असलेले अपघात, अपूर्ण आहार, रक्तवाहिन्यांचे गोठणे आणि स्नायू किंवा पेशींची झीज होणे या गोष्टींना स्वत: किंवा कधीकधी वैद्यकीय मदतीच्या आधारे तोंड देत असते. परंतु काळाच्या ओघात, ह्यापैकी एखाद्या किंवा संयुक्त कारणामुळे मृत्यु येण्याची शक्यता फारच कमी म्हणजे जवळजवळ अशक्यच आहे. कारण सामान्यपणे नंतर कधीतरी मृत्यु येतो. अशावेळी हे अपघात, कुपोषण वगैरेंना मृत्युचे कारण कसे समजावे? ह्याचाच अर्थ मृत्युचे कारण आतडी, नसा किंवा हृदय येथे नसून दुसरीकडे कोठेतरी आहे.

मृत्युबद्दल स्नायूंच्या पेशी किंवा मज्जातंतूचे तुटणे हे एक कारण सांगितले जाते. कारण संबंध आयुष्यभर त्यांची जागा दुसरे कोणी घेत नाहीत व त्या बदलत नाहीत. वर्षे लोटतात आणि नाड्यांच्या पेशी कमकुवत होत जातात; आणि संपूर्ण मज्जासंस्था कुचकामी होत जाते. जर मानवी शरीरातील परिणाम करणारी संस्था फक्त मज्जासंस्थाच आहे असे मानले तर, ज्या शरीरात मज्जासंस्थाच नाही असे शरीर दीर्घतम कालावधीपर्यंत टिकणे सहज शक्य आहे असे कुणी म्हणू लागले तर ते बरोबर ठरेल.

परंतु ह्या विचारास, प्रत्यक्ष निरीक्षण मान्यता देत नाही. एखादे झाड, जे मज्जासंस्थाविरहित आहे, ते माणसापेक्षा अधिक काळपर्यंत जगते, हे खरे आहे. किंबहुना सर्व ज्ञात झुडुपांपेक्षा त्याचे जीवनमान अधिक आहे. परंतु गव्हाची लोंबी, जिला मज्जासंस्थाच नाही, तिचे आयुर्मान ८ महिन्यांचे असते; आणि एकपेशीय अमीबा फक्त अर्धा तासच जगू शकतो. ही उदाहरणे वरील तर्काच्या नेमक्या विरुद्ध जातात. ते म्हणजे, पशु योग्य प्रकारे मज्जासंस्था लाभल्यामुळे जास्त दिवस जगावेत, ही अपेक्षा आहे. परंतु प्रत्यक्षात तसे घडत नाही. उत्क्रांतीवादाच्या तत्त्वप्रणालीप्रमाणे खालच्या स्तरावरील प्राणी उदाहरणार्थ, मगर, कासव आणि मासे हे अधिकतम आयुर्मानाचे दिसतात.

मृत्यु म्हणजे खात्रीशीर शेवट नाही असे दाखविण्याचे जेवढे प्रयत्न

आजवर झाले ते सर्व अयशस्वी झाले आहेत. तरीही सर्व मानवांना शेवटी मृत्यु येणार आहे हे निर्विवाद सत्य शिल्लक राहातेच. मृत्युला कोणीही टाळू शकत नाही. फ्रान्समधील नोबेल पारितोषिक विजेते डॉ. ॲलेक्सी कॅरेल (Dr. Allexis Carrel) ज्यांनी शरीरांतर्गत अवयवांच्या संस्कृतीचा फार अभ्यास करुन शेवटी 'इनवर्ड टाईम' या शीर्षकाखाली हा प्रश्न चर्चिला आहे.

'अमरत्व कसे प्राप्त होईल याचे संशोधन करण्यासाठी माणूस कधीही थकणार नाही. तो त्यात कधीही यशस्वी होणार नाही. कारण शरीरशास्त्राच्यां विशिष्ट नियमांनी तो बद्ध आहे. मृत्युला काही प्रमाणात तो रोखू शकेल, काही घटनांचा क्रम उलटवू शकेल, परंतु मृत्युला काही टाळू शकणार नाही.

विश्वाच्या ह्या सध्याच्या यंत्रणेमध्ये मधूनमधून क्षुल्लक संकटाच्या स्वरुपात ज्या अघटित घटना घडतात, त्या म्हणजे, भविष्यात मोठ्या प्रमाणावर काय घडणार आहे याचीच झलक!

पृथ्वीवरील भूकंपाची घटना, आपणास न्यायाच्या दिवसाची आगामी सूचनाच देत असते. पृथ्वीच्या पोटात लालभडक असा तप्त लाव्हा रस भरलेला आहे. अधूनमधून ज्वालामुखीच्या तोंडातून बाहेर पडत असतो. कधीकधी पृथ्वीच्या पृष्ठभागावर वेळोवेळी पडणाऱ्या सुरकुत्यांनी व त्यांचे प्रचंड प्रमाण पाहता, त्यामुळे होणाऱ्या भूकंपावरुन असे दिसते की हे सर्व निसर्गाने मानवावर केलेले  आघातच आहेत. यात निसर्गाचा नेहमीच वरचष्मा असतो. एखाद्या सफरचंदाची केवळ साल काढावी अशा पद्धतीने पृथ्वीचा पातळ पृष्ठभाग जरा कुठे थरथरला, तर आतील तप्त लाव्हा रस बाहेर येऊन, आपण त्यापासून दूर होतो. यावरुन पृथ्वीवरील वस्तीपैंकी, ज्याचे शांत, सुरम्य वैभवनगरी व निळेशार समुद्र म्हणून वर्णन करतो, तो भाग म्हणजे भौतिक नरक म्हटले तर आश्चर्य वाटावयास नको.

अशा तऱ्हेचे भूकंप जवळजवळ दररोज कमीजास्त प्रमाणात पृथ्वीवर सगळीकडे होत असतात. इतिहासातील सर्वांत पहिला म्हणून सर्वात जुना भूकंप शेन्सी (Shensi) या चीनमधील जिल्ह्यात नोंदला गेला. त्याचप्रमाणे १ नोव्हेंबर, १७५५ मध्ये पोतुर्गाल येथे ज्वालामुखीचा उद्रेक होऊन लिस्बन शहर संपूर्ण नष्ट झाले. शेन्सी येथे सुद्धा ८ लाखापेक्षा अधिक जीवित हानी झाली. लिस्बन येथील भूकंप फक्त सहा मिनिटे टिकला व ३० हजार माणसे मृत्युमुखी पडली. सर्व इमारती कोसळल्या. युरोपच्या चौपट क्षेत्राएवढे क्षेत्र

कंप पावले असा अंदाज आहे. ख्रिस्तोत्तर काळात १८७७ मध्ये सुद्धा इतक्याच क्षमतेचा भूकंप आसामात नोंदला गेला. जगात झालेल्या पाच मोठ्या भूकंपांपैकी हा एक मानला जातो. आसामच्या उत्तरेकडील भाग मोठ्या दारुन संकटात सापडला होता. तेथे भूकंपाचा मोठा हादरा बसला होता. त्यामुळे ब्रह्मपुत्रा नदीच्या प्रवाहाची दिशा बदलली आणि एव्हरेस्ट शिखर ३० मीटरने उंचावले. वस्तुतः भूकंप म्हणजे  पुनरुत्थानाचा दिवस येणार याची छोटीशी आठवण करुन देणारी घटना. जेव्हा पृथ्वी प्रचंड आवाज करुन दुभंगते, तेव्हा पत्त्यांचा बंगला कोसळावा त्याप्रमाणे इमारती कोसळतात. जेव्हा पृथ्वीचा वरचा पृष्ठभाग कोसळतो व आतील भाग बाहेर निघतो, तेव्हा क्षणापूर्वी जेथे चांगले जीवन जगले जात असते, तेथे राखेचे ढिगारे उभे राहतात; पृथ्वीवर मृत शरीरांचे ढीग, समुद्रकाठी माशांचे थवे पसरावेत त्याप्रमाणे विखुरले जाऊन पसरतात. निसर्गापुढे मानव हतबल होतो. भूकंप व ज्वालामुखी, दोहोंच्या बाबतीत सर्वांत वाईट गोष्ट ही आहे की ते दोन्ही केव्हा व कोठे घडतील याचा कोणीही अंदाज सांगू शकत नाही. आणि ते जेव्हा होतात, तेव्हा कोणालाही अल्पसा किंवा जवळजवळ काहीही अवधी सुटका करुन घेण्यास मिळत नाही, इतक्या क्षणार्धात होतात. आपल्या सर्वांचा पुनरुत्थानाचा दिवस असाच भूकंपासारखा अचानक येणार आहे. अशा तऱ्हेचे नैसर्गिक आपत्तींचे प्रदर्शन जणू काही ईश्वर पृथ्वीचा कोणत्याही क्षणी नाश करु शकणार आहे व तेवढा तो समर्थ आहे, हेच दाखविते.

विश्वाच्या आवाक्यापलिकडे तर याहून अनेक भयानक घटना घडत असतात. अवकाशाच्या अमर्याद पोकळीत, असंख्य तारे, एखाद्या विस्तिर्ण प्रदेशावर अनेक भोवरे असावेत त्याप्रमाणे सैरावैरा फिरत आहेत. त्यांचा वेगही इतका प्रचंड आहे की, आपण कितीही वेगवान विमान अथवा अवकाशयान घेऊन त्यांना पकडू म्हटले तरी ते शक्य नाही. ह्या प्रक्रियेमध्ये आकाशस्थ तारे, हजारो बॉम्बपैकी विमाने एकाचवेळी उड्डाण करुन आल्यानंतर एकमेकांशी टक्कर घ्यावी त्याप्रमाणे एकमेकांशी टक्कर घेत असतात. त्यांचा अभ्यास करुन खगोलशास्त्रज्ञांनी हे शक्य आहे असे मत मांडले. तरी प्रत्यक्षात त्यांची टक्कर झाली तरी आश्चर्य वाटायला नको. (एकमेकांशी टक्कर होत नाही हे खरे आश्चर्य!) आपली सूर्यमाला अशाच

टकरींचा परिणाम असावा. जर आपण अशा तऱ्हेने मोठ्या प्रमाणावरील टकरींचा अंदाज अगोदरच जाणू शकलो तर जगाच्या पुनरुत्थानाचा दिवस फार दूर असणे शक्य नाही, किंवा सुरुवातीला अपेक्षा केली त्याप्रमाणे होण्याची शक्यता अजिबात नाही. मृत्युनंतर जीवन आहे या संकल्पनेवर विश्वास असणारे असे मानतात की, सृष्टीचा विनाश घडवून आणणाऱ्या विध्वंसक शक्ती ह्या आतासुध्दा गुप्त स्वरुपात निसर्गात आहेत आणि एके दिवशी त्या आपले भयानक स्वरुप गर्जना करीत प्रकट करतील. जे आज गुप्त आहे ते कधी ना कधी तरी निश्चितच उघड होणार आणि पुनरुत्थानाचा दिवस येणार हेही निश्चित. आज आपण ती एक घटना समजतो, कदाचित उद्या त्या घटनेचे आपणच साक्षीदार असू.

एकदा का कयामत (शेवटचा दिवस) येणार ही शक्यता आपण मान्य केली तर लगेच प्रश्न उभा राहतो मृत्युनंतर काही जीवन वगैरे आहे काय? या प्रश्नाचे उत्तर आज तरी नकारात्मक आहे. कारण आज, जीवन ज्या घटकांनी भरलेले आहे. त्याचाच आपण आयुष्यभर विचार करीत असतो. आयुष्यातील सर्व घटक व्यवस्थित क्रमवार लावून जीवनाचा विकास कसा होईल ह्यासंबंधी चिंतन करीत असतो. आणि याच पार्श्वभूमीवर, मृत्यु हा सर्व घटनाक्रम तोडून टाकणारा आहे. असा उपसिद्धांन्त मांडतो. या वैचारिक भूमिकेचा परिणाम असा होतो की, मृत्युनंतर जीवन असू शकेल असा विचार आम्ही झटकून टाकतो. त्याची हकालपट्टी करतो.

टी.आर. मिल्स् पुनरुत्थानाच्या कल्पनांचे सांकेतिक सत्य मान्य करतो पण प्रत्यक्षात ती स्वीकारण्यास नकार देतो.

मृत्युनंतर लोकांनी अनुभवलेले जीवन या अक्षरश: ठाम व महत्त्वाच्या घटनात्मक विधानाची सत्यता पडताळून पाहाण्यासाठी तत्त्वत: अनुभवाचा साक्षात्कार आपणास व्हावयास हवा असेच मला वाटते. यातील मुख्य अडचण मात्र अशी आहे की, वरील प्रश्नांचे खरे उत्तर शोधण्यासाठी प्रथम आपणास मृत्यु यावा लागेल. त्याचा अंदाज करणे मात्र शक्य आहे. उदाहरणार्थ, अशी चर्चा करणे शक्य आहे की, ज्याप्रमाणे मज्जातंतूचा अभ्यास करणाऱ्यांच्या मते आपल्या शरीरात जोपर्यंत मेंदू काम करीत असतो, तोपर्यंतच चैतन्य वसत असते; आणि जेव्हा मेंदू काम देईनासा होतो, तेव्हा तसे कोणतेही चैतन्य शरीरात दिसून येत नाही.

परंतु अशा काही समजुती आहेत, ज्याद्वारे असे सूचीत होते की, शरीरांतर्गत जडद्रव्यांचे किंवा घटकांचे कुजणे म्हणजे जीवन संपुष्टात येणे हे खरे नाही. आणि ह्या समजुतींना काही महत्व प्राप्त झाले आहे. जडद्रव्य घटकात काही बदल झाला तरी जीवनाला एक सुस्पष्ट व वेगळी अस्मिता आहे हे ओळखण्यास आपण शिकले पाहिजे; तशी तयारी ठेवली पाहिजे. आपल्याला हे ठाऊक आहे की मानवी शरीर ज्या घटकांनी बनले आहे, त्यांना पेशी असे म्हणतात. सचेतन जीवनातील ह्या पेशी म्हणजे मूलभूत घटक आहेत. त्यांची रचना उच्च प्रतीची व विशिष्ट गुंतागुंतीची आहे. मानवी शरीरात अशा असंख्य पेशी (कोट्यवधी) आहेत. मानवी शरीररुपी इमारतीची एक एक वीट म्हणजे जणू या पेशी!(येथे पेशीचे वर्णन वीट म्हणून यासाठी केले आहे की तिचे कार्य व अंतर्गत रचना समजावी.) (प्रत्यक्षात प्रत्येक पेशी म्हणजे पूर्णपणे वाढलेले पण अतिशय गुंतागुंतीचे एक स्वतंत्र शरीर असते. पेशींचा स्वतंत्र्यपणे अभ्यास करण्यासाठी विज्ञानाची एक स्वतंत्र शाखा आहे, ज्याला Cytology म्हणतात). मानवी शरीर या अशा कोट्यवधी पेशींचे बनले आहे; फरक फक्त एवढाच आहे की, इमारत बांधताना वीट जशी असते तशीच राहाते, पेशीमध्ये मात्र सतत काहींना काही बदल होत राहातो. यालाच चयापचय (metobolism) क्रिया म्हणतात.

ज्याप्रमाणे एखादी ग्रंथी सतत काम करीत राहाते, तेव्हा अवयवांची झीज होत असते; त्याचप्रमाणे शरीररुपी यंत्राची सुद्धा कायम झीज होत असते. आपल्या रोजच्या जीवनात अशा पेशीरुपी विटा तयार होतात. मात्र ही होणारी झीज आपण अन्न खाऊन भरुन काढीत असतो. एकदा अन्नाचे पचन झाले म्हणजे त्यापासून वेगवेगळ्या पद्धतीने पेशी तयार होऊन शरीरातील पेशींची कमतरता भरुन काढतात. आपले शरीर म्हणजे पेशींचे एक खास मिश्रण आहे, ज्यात नेहमी बदल होत असतो. एखादी नदी असावी, की जिच्यामध्ये पाणी तर असावे पण ते कायम बदलते असावे, त्याप्रमाणे आपले शरीर आहे. प्रत्येक क्षणाला जुने पाणी नवीन पाण्याने बदलले जाते. मात्र तेच पाणी नेहमी बदलून वाहात असते!

आपल्या शरीरात पेशींचा हा बदल इतका सातत्याने चालत असतो की एक वेळ अशी येते की शरीरातील या सर्व विटा संपूर्ण झिजून त्यांची जागा नव्या विटा घेतात. बालपणी ही क्रिया अधिक जलद होत असते. वय वाढते

तशी ही क्रिया दिवसेंदिवस मंदावते. संपूर्ण आयुष्यात सरासरीने दर दहा वर्षांनी संपूर्ण पेशी बदलल्या जातात. पेशींची ही नष्ट होण्याची व शरीर झिजण्याची क्रिया सतत चालूच असते. मात्र आतील मूळ मानवी सांगाडा तोच असतो. आयुष्यभर मात्र माणूस असे समजत असतो की जो जन्माला आला होता तोच मूळ माणूस आहे. वस्तुस्थिती मात्र अशी असते की त्याचे डोळे, कान, नाक, हात, पाय, केस, नखे, इत्यादी मूळ स्वरुपात शिल्लक राहिलेले नसते.

आता शरीर मृत झाले (पेशी नष्ट झाल्या या अर्थाने) म्हणजे त्यात वस्ती करुन राहणारा माणूससुद्धा मृत होऊन नाहीसा व्हायला हवा किंवा दुसऱ्या स्वरूपात (नवीन पेशी उत्पन्न झाल्या म्हणून) निर्माण व्हायला हवा. परंतु प्रत्यक्षात असे घडत नाही. तो त्याच्या मूळ स्वरुपात व देहाने तसाच राहातो आणि तरीही अशा अर्थाने मृत होऊन व शरीर झिजून, स्वत:चे व्यक्तिमत्व कायम ठेवतो. मनुष्य एखाद्या नदीसारखा आहे. माणसाचे व्यक्तिमत्व त्या नदीमधील एखाद्या बेटासारखे आहे, ज्यावर सतत वाहाणाऱ्या पाण्याप्रमाणे बेटावर जसा परिणाम होत नाही, तसा सतत बदलणाऱ्या पेशीमुळे काही परिणाम होत नाही म्हणूनच शास्त्रज्ञांनी जीवन किंवा मानवी व्यक्तिमत्व हे एक स्वतंत्र अस्तित्व मानले असून सतत बदल झाले तरी ते कायम असते. अशी त्यांची धारणा आहे. शास्त्रज्ञ म्हणतो, व्यक्तिमत्व म्हणजे परिवर्तनीय अपरिवर्तनीयत्व. आता मृत्यु म्हणजे शरीराचा नाश असे धरले तर ज्याज्या वेळी शरीरातील संपूर्ण पेशी बदलल्या जातात, त्यात्या प्रत्येक प्रसंगी मृत्यु आला असे समजायचे. आपण त्याला हालचाल करताना, जिवंत पाहातो याचाच अर्थ त्याचा पुनरुद्धार झाला. वेगळ्या भाषेत बोलायचे तर याचा असा अर्थ होऊ शकतो की, पन्नास वर्षे वयाचा माणूस त्याच्या आयुष्यात पाच वेळा मृत्युचा अनुभव घेऊन चुकला. जर माणसाला त्याच्या पन्नास वर्षांत दर दहा वर्षांनी एकदा या प्रमाणे पाच वेळा (शारीरीक) मरण आले; तर त्याच प्रमाणे सर्वांत शेवटी तो जेव्हा मृत्यु पावतो, तेव्हा खरोखरच त्याचे जीवन संपले आहे यावर विश्वास ठेवण्यास आम्हास काय कारण? (याचे कोणतेही समर्थन आमच्याकडे नाही).

ज्यांना हा खुलासा स्वीकृत नसेल – त्यातल्यात्यात आधुनिक तत्त्वज्ञानी, जे आत्मा म्हणजे एक स्वतंत्र अस्तित्व किंवा बाब आहे या

संकल्पनेला विरोध करतात - ते ह्याच गोष्टीवर ठाम आहेत की, मन किंवा आतील अस्तित्व वगैरेंना स्वतंत्र व्यक्तिमत्व वगैरे काही नसते. मनुष्य म्हणजे शरीर व बाह्य जग यांतील क्रिया-प्रक्रिया केवळ परिणामस्वरुप आहेत. ज्या प्रमाणे दोन धातूंच्या घर्षणाने उष्णता निर्माण होते, त्याप्रमाणे जडद्रव्यांतून मानवाची घडण होताहोताच भावना व विचारांचा माणसात विकास होतो. सर जेम्स जीन्स ह्या मताचे होते की जागृतावस्था म्हणजे एक कर्म किंवा प्रक्रिया आहे आणि तत्कालीन तत्त्ववेत्ते असे मानत की जागृतावस्था म्हणजे स्नायुमय मज्जातंतूने बाह्य चेतनेला दिलेला प्रतिसाद. या संकल्पनेप्रमाणे एकदा का मनुष्य मरण पावला म्हणजे तो जैविकदृष्ट्या भंग झाला. मग त्याच्या जगण्याची आशा संपली. कारण बाह्य जगताशी संबंध जोडणाऱ्या व त्याप्रमाणे शरीरांतर्गत प्रतिसाद देणाऱ्या, ज्याला आपण विश्वात जगणे म्हणतो, त्या मज्जातंतूंचा मृत्युनंतर कोणताही संबंध राहात नाही. मृत्युनंतरचे जीवन ही संकल्पना वरील दृष्टीकोनातून पाहिल्यास अबौद्धिक आणि वस्तुस्थितीवर आधारलेली वाटत नाही.

ह्या ठिकाणी मला एक गोष्ट सांगाविशी वाटते की जर माणसाच्या अस्तित्वाच्या एवढ्याच बाबी असतील असे गृहित धरले तर आम्ही खरोखरच एक जागृत व जिवंत माणूस निर्माण करु शकतो. आज आम्हाला मानवी शरीरातील प्रत्येक अवयव व घटक यांच्याबद्दल संपूर्ण माहिती आहे. हे सर्व घटक पृथ्वीच्या पृष्ठभागावर आणि अवकाशात विपुल प्रमाणात उपलब्ध आहेत. शरीरातील प्रत्येक यंत्रणेची सखोल अशी तपासणी आम्ही अतिसूक्ष्म डोळ्यांद्वारे केली आहे. आणि आपल्या हाडांचा सापळा, स्नायू, स्नायुतंतू वगैरे कसे तयार झाले याबद्दल आम्हाला खूपच माहिती झाली आहे. त्याशिवाय आमच्याकडे मनुष्याच्या आकारासारखे हुबेहूब आकार तयार करणारे कुशल विशेषज्ज्ञसुद्धा हजर आहेत. जर आत्मा आहे ह्या संकल्पनेच्या विरोधी लोकाना हे खरोखर पटले की त्यांचा दृष्टिकोन योग्य आहे तर त्यानी त्यांचा मुद्दा जेथे त्यांना योग्य प्रतिसाद मिळू शकेल अशा वातावरणात मानवी शरीरे तयार करुन पटवून दाखवावा. जगाला त्यांनी दाखवून द्यावे की अशा तयार झालेल्या मानवी शरीराकडून योग्य त्या वातावरणात अंतर्गत कार्ये कशी चालतात.

वस्तुत: सत्य हेच आहे की पृथ्वीवरील कोणीही मानव कृत्रिम

पद्धतीने, दुसऱ्या मानवाची निर्मिती करु शकत नाही. कोणीही मृत शरीराच्या मांसाच्या गोळ्यात, चैतन्य फुंकू शकत नाही. वरील गोष्टींवरुन, जीवन म्हणजे नुसता पेशींमधील बदल व एकत्रित येणे ह्यापेक्षा काहीतरी वेगळे आहे, हे जरी लक्षात आले तरी पुरेसे आहे.

मृत्युनंतर जीवन सुरु राहण्याची शक्यता आजमावून पाहताना आपण ह्या प्रश्नाकडे, अशा संकल्पनेवर विश्वास ठेवण्यामागील हेतू काय आहे, हेही पाहणे गरजेचे आहे. धर्म हे उघडपणे व अतिशय स्वच्छ शब्दांत सांगत आहे की, जीवन म्हणजे केवळ जन्म, मृत्यु व पुनरूत्थान असे नीत्शेने सांगितल्याप्रमाणे अर्थहीन चक्र नाही किंवा काहीही कारण नसताना, कालमापक यंत्रातील वाळू खालीवर करण्याप्रमाणे जगणे नव्हे, तर उलटपक्षी संपूर्ण मानवजातीची काळाने घेतलेली एक कसोटी आहे आणि मृत्युनंतरचे जीवन म्हणजे मिळालेली शिक्षा किंवा बक्षिस आहे. धर्माच्या ह्या तत्त्वप्रणालीचे एकच ध्येय अथवा उद्देश आहे व तो म्हणजे, ज्याच्यापासून व्यक्ति किंवा समाज बनला, त्या समाजाच्या प्रत्येक घटकाला, समाजाचे नैतिक बंधन, इश्वराचे भय दाखवून, अधिकाधिक घट्ट करणे हा होय.

येथून पुढील जीवन उच्चस्तरीय व प्रसंशनीय असेच राहाणार आहे, कारण, ह्या विश्वास एकूण एक मनुष्य जे जे काही नित्यकर्मे दररोज करतो, ते ते सर्व त्याच क्षणाला तंतोतंत कोठेतरी नोंदवले जात आहे. माणसाचे व्यक्तिमत्व तीन स्वरुपात प्रकट होते - हेतू, शब्द व कृती. संपूर्ण आयुष्यभराची ह्या तीनही स्वरुपात नोंद स्मृतीरुपाने, वैश्विक स्तरावर व्यवस्थितरित्या केली जाते व कोणत्याही क्षणात सामोरी आणता येते. पृथ्वीवरील कोणाचेही जीवन व जीवनातील प्रत्येक बारिकसारिक घटना रहस्य म्हणून राहाणार नाहीत. त्यामुळे कोणी ईश्वराने सांगितलेला मार्ग अनुसरला, कोण सैतानाच्या मार्गाने गेला, कोणी देवदूताकडून प्रेरणा घेतली व कोणी दुष्टतेचा मार्ग अवलंबिला हे समजणे शक्य होईल.

आमच्या मनात आलेले विचार आम्ही चटकन विसरतो, त्यामुळे आम्हाला वाटते की आमच्या मनातून ते विचार कायमचे पुसले गेले आहेत. परंतु जेव्हा आम्ही पूर्वी एखाद्या घडलेल्या घटनांचे स्मरण करतो, किंवा एखाद्या मनोरुग्णास (स्वप्न) नजिकच्या काळातील घटनांचे स्मरण होते परंतु भूतकाळातील घटनांचे विस्मरण होते, तेव्हा, मानवी मन हे फक्त

जागृतावस्थेतीच घटनांचे अथवा अनुभवांचे स्मरण ठेवते असे नाही ह्याची खात्री, नव्हे पुरावाच मिळतो. मानवी मनात, स्मरण शक्तीच्या सर्वच कप्प्यांबाबत सर्वजण जागरुक असतातच असे नाही. मुळात असे कोणतेही वेगवेगळे कप्पे नसतात. अनेक प्रयोगांती असे सिद्ध झालेले आहे की कोणताही अनुभव पहिल्या प्रथम जसा घडलेला असतो, तसाच ठसा त्या त्या व्यक्तीच्या मनावर कायमचा उमटतो. आणि आपली इच्छा असली तरीही तो ठसा आपण मनाच्या पाटीवरुन पुसून टाकू शकत नाही. ह्या संशोधनावरुन असे खात्रीशीर वाटते की, मेंदूच्या काही भागावरच मानवी व्यक्तिमत्व अवलंबून आहे असे नाही. उलटपक्षी, जागृतावस्थेच्या जवळच मेंदूत अशी जागा आहे ज्यावर व्यक्तिमत्त्वाचा फार मोठा भाग अवलंबून आहे. फ्रॉडच्या मताने हा भाग म्हणजे अंतर्मन किंवा अबोध मन होय. मानवी मन एखाद्या हिमनगासारखे आहे, ज्याच्या आकारमानाचा १/९ भाग समुद्रपृष्ठावर दिसतो पण उरलेला मोठ्यात मोठा भाग (८/९) पाण्यात बुडालेला असतो. त्यामुळे तो दिसत नाही. त्याचप्रमाणे, ह्या अदृश्य अंतर्मनात आपले सर्व विचार किंवा हेतु सुरक्षित असतात. फ्रॉड त्याच्या एकतिसाव्या व्याख्यानात विस्तृतपणे म्हणतो :

तर्कशास्त्रीय नियम – वस्तुत: विसंगतीचेच नियम सुप्तमनावर अंमल करु शकत नाहीत. विसंगतीचे संकेत सुप्तमनात असतात. तेथून ते दूर जात नाहीत व तटस्थही राहात नाहीत. जास्तीतजास्त ते आपली शक्ती काळजीपूर्वक एकत्रितपणे वापरतात. सुप्तमनात जे आहे त्याची तुलना अभावाशी (नकाराशी) होणे शक्य नाही. अवकाश आणि काळ ही मानसिक कृत्यासाठी आवश्यक बाब आहे ही तत्त्ववेत्त्यांची भूमिका अपवादात्मक आहे हे पाहून आश्चर्य वाटेल. सुप्तमनात काळ ह्या संकल्पनेला कोणताही थारा नाही; काळ कसा व्यतित होतो यालाही महत्त्व नाही. (जी आश्चर्यकारक गोष्ट असून भौतिक विचारात जिच्याकडे फार महत्व दिले जायला हवे) काळ व्यतीत झाल्यामुळे कोणताही बदल मानसिक प्रक्रियांमध्ये होत नाही. इच्छांचे किंवा वासनांचे संकेत (Conative Impulses) सुप्त मनाच्या बाहेर जात नाहीत. आणि दबावामुळे सुप्तमनात जे ठसे उमटविले जातात, ते जवळजवळ अनैतिक असतात; व सर्व दशकात अशा तऱ्हेने सुरक्षित ठेवले जातात, जणू काही कालपरवाच त्या घटनांचे संकेत मिळाले असावेत.

मानसशास्त्रात अंतर्मनाची ही तत्त्वप्रणाली मान्यता पावली आहे. परिणामी प्रत्येक चांगला अथवा वाईट विचार माणसाच्या मनात उत्पन्न होतोच. त्याच्या हृदयावर अथवा आत्म्यावर वज्रलेपासारखा कोरला जातो, या कल्पनेला पुष्टी मिळाली. कालप्रवाह अथवा घटनांचे वेगवेगळे क्रम अथवा संच यामुळे यात किंचितही बदल संभवत नाही. अशा प्रकारे माणसाची इच्छा असो वा नसो, विचार नोंदवून ठेवण्याची ही प्रक्रिया अखंड चालूच राहाते.

अंतर्मनात ह्या सर्व घडामोडींची नोंद घेण्याचे व सुरक्षित ठेवण्याचे निसर्गाचे हेतू काय आहेत याची दखल मात्र फ्रेडने घेतलेली नाही. तत्त्वचिंतकांनी यावर चिंतन करावे अशी गरज त्याला वाटावी. परंतु आम्ही, मृत्युनंतरच्या जीवनाच्या संकल्पनेबाबत ह्या घटनेचा संदर्भ तपासून पाहिला, तत्क्षणी त्यातील गर्भितार्थ आमच्या लक्षात आला. त्यातून उघडपणे असे दिसून आले की, येथून पुढील जीवनात एक स्पष्ट अशी शक्यता येणार आहे की, ज्यात माणसाला, त्याने पृथ्वीवर केलेल्या प्रत्येक कृत्याची अचूक व संपूर्ण नोंद त्याच्यापुढे ठेवण्यात येईल. तो कसा विचार करतो, त्याचे हेतू काय असतात याचा पुरावा समोर असताना, स्वत:चे अस्तित्व कसे आहे हे त्याला समजू शकेल आणि विश्वास असताना कसे वागावे, याचे मार्गदर्शन त्यास होईल. कसा वागला हेही समजेल.

''आम्ही मानव घडविला व त्याच्या मनात उमटणारे विचार आम्ही जाणतो आणि मानेच्या मुख्य रक्तवाहिनीपेक्षाही आम्ही त्याला जास्त जवळचे आहोत. (कुराण ५० : १६) माणसांच्या शब्दांचे काय होते याचा आपण विचार करुया. उच्चारलेला प्रत्येक शब्द सावध रक्षकांकडून नोंदवून घेतला जातो''(कुराण ५० : १८)

मानवाने उच्चारलेला प्रत्येक शब्द मग तो गोड असो वा कडू, सत्य असो वा असत्य, चांगला असो वा वाईट, एकूणएक शब्द वैश्विक पातळीवर नोंदला जात असतो. आणि या प्रत्येक शब्दाबद्दल माणसाला जबाबदार धरले जाणार आहे. न्यायदानाच्या – अखेरच्या दिवशी ह्या नोंदीनुसार न्याय होणार आहे.

एखाद्या शांत पाण्याच्या तळ्यात दगड टाकल्याने पाण्याच्या पृष्ठभागावर जसे तरंग निर्माण होतात, त्याचप्रमाणे माणसाला प्रत्येक

शब्दासाठी जिभेची जी हालचाल करावी लागते, त्यामुळे हवेत ध्वनीलहरी तयार होतात. एखादी विजेची घंटा जर काचेच्या हवाबंद बरणीत ठेवून, सर्व हवा काढून घेऊन बटन दाबले, तर विजेचा प्रवाह तारेत जाऊन जरी घंटा वाजत असताना दिसत असली तरी आवाज मात्र ऐकू येणार नाही. कारण घंटेपासून निघणाऱ्या ध्वनीलहरी हवेच्या पोकळीमुळे आपल्या कानापर्यंत येऊन पोहोचत नाहीत. कदाचित विजेच्या तारांपासून वाहणारा घंटेचा आवाज फक्त ऐकू येण्याची शक्यता आहे, पण ती सुद्धा जाणवणार नाही इतकी अस्पष्ट असेल. घंटेचा आवाज तेव्हाच ऐकू येईल, जेव्हा त्यापासून निर्माण होणाऱ्या ध्वनीलहरी मुक्तपणे कानाच्या पडद्यावर आदळून अंतर्कर्णेंद्रियाद्वारे मेंदूपर्यंत पोहोचतील. त्यानंतर आपल्याला, जो ऐकू येतो तो घंटेचा आवाज आहे की, पक्ष्यांचे चिवचिवणे आहे की, शब्दांची एक मालिका आहे याचा अर्थबोध होईल.

एकदा निर्माण केलेल्या ध्वनीलहरी वातावरणात कायम अस्तित्वात राहतात, असे सिद्ध झालेले आहे. आज जरी आपले विज्ञान, वातावरणातील शब्द पुन्हा पकडून त्याचा पुनरुच्चार करण्याइतपत प्रगत झालेले नसले तरी, विज्ञानाची प्रगती व प्रमाण इतक्या झपाट्याने होत आहे की, पुढील काही काळात तेही करणे आपणास शक्य होऊ शकेल. तात्त्विकदृष्ट्या हे मान्य करण्यात आले आहे की, ज्याप्रमाणे रेडिओकेंद्रावरून प्रक्षेपित केले गेलेले शब्द, आपण घरी रेडिओद्वारा ऐकू शकतो, त्याप्रमाणे भूतकाळात जे काही उच्चारले गेले आहे ते, भविष्यकाळात कधीतरी ऐकणे सहज शक्य आहे. एखाद्या विविक्षित क्षणी प्रत्येकाने उच्चारलेले शब्द वेगळे कसे काढले जावेत हाच त्यातील एक प्रमुख अडथळा राहाणार आहे. रेडिओकेंद्रांच्या प्रक्षेपणात सुद्धा हाच एक अडथळा आहे. जगात शेकडो रेडिओकेंद्रे आहेत, जी एकाचवेळी वेगवेगळ्या प्रकारच्या असंख्य ध्वनीलहरी सेकंदाला सुमारे ३ लक्ष किलोमिटर या प्रचंड वेगाने आकाशात प्रक्षेपित करीत असतात. एखाद्याला वाटेल की, ध्वनीलहरींचा वेग, त्यांची अगणित संख्या, प्रक्षेपणाचा अमर्याद विस्तार पाहता, ऐकू येणारे संभाषण गोंधळात टाकणारे व न समजण्यासारखे असे असेल. परंतु प्रत्यक्षात तसे घडत नाही. कारण वेगवेगळी रेडिओ केंद्रे, वेगवेगळ्या ध्वनीलहरी, स्वतंत्र लहरींच्या वेगाने म्हणजे लघु अथवा दीर्घ या पद्धतीने प्रक्षेपण करीत असतात, व आपण

आपले रेडिओ त्या त्या केंद्राच्या लहरींच्या वेगांच्या क्षमतेनुसार योग्य त्या बँडला लावले तर आपणास पाहिजे तो कार्यक्रम, संभाषण इतरांच्या आवाजाचा त्रास न होता ऐकावयास मिळते.

नैसर्गिक ध्वनीलहरी वेगळ्या करुन ऐकण्याचे यंत्र अद्यापी विकसित व्हायचे आहे. पण रेडिओकेंद्राने प्रक्षेपित केलेल्या वेगवेगळ्या ध्वनीलहरी कृत्रिमरित्या ऐकता येणे ह्यात मिळालेले यश ही घटनाच इतकी बोलकी आहे की, भविष्यात केव्हातरी नैसर्गिक आवाज स्पष्टपणे व वेगवेगळे ऐकण्यात आपण नक्कीच यशस्वी होऊ शकू. त्यावेळी आपणाला पूर्वीच्या काळचा मानवी इतिहास आवाजाच्या रुपाने प्रथम दर्शनी पुरावा मिळावा त्याप्रमाणे मिळू शकेल. एकदा का ही समजूत आपण स्वीकारली म्हणजे माणसाने उच्चारलेला प्रत्येक शब्दनशब्द, त्याच्या चांगल्या व वाईट कृत्यासह निसर्गात नोंदला जाऊन, त्याचा जाबे देणे त्यास भाग पडेल.

आता असे उघडकीस आले आहे की, इराणच्या माजी पंतप्रधानाला कैद्यावस्थेत असताना, त्याच्या खोलीत गुप्तपणे असे यंत्र ठेवण्यात आले होते की, जे त्याने उच्चारलेल्या प्रत्येक शब्दाची नोंद रात्रंदिवस घेत राहील आणि त्याला जेव्हा न्यायालयात आणले जाईल तेव्हा त्याच्याविरुद्ध पुरावा म्हणून वापरता येईल. याच पद्धतीने ईश्वराचे अदृश्य दूत प्रत्येक व्यक्तीच्या भोवती वावरत असून, त्यात्या व्यक्तीने उच्चारलेला प्रत्येक शब्द, केलेली कृती व विचार हा वैश्विक पातळीवर अगदी अचूकपणे नोंद करुन घेत आहेत.

आपल्या कृत्यांची नोंद प्रत्यक्षात कशी होते? वैज्ञानिक संशोधनाने हे आश्चर्यकारकरित्या दाखवून दिले आहे की, आपली प्रत्येक कृती, खाजगी वा सार्वजनिक, भर दिवसा स्वच्छ सूर्यप्रकाशात अथवा रात्रीच्या गडद अंधारातील आकाशात छायारुपाने रेंगाळत असते. ही छायारुपे संपूर्ण आयुष्याच्या जीवनपटातील रहस्ये कोणत्याही क्षणी उलगडून दाखविण्यास उपयोगी पडतात.

अलीकडील विज्ञानाने असे सिद्ध केले आहे की, कोणतीही वस्तू, मग ती स्थिर असो किंवा हलती असो, अंधारात असो की उजेडात असो, आपल्या शरीरातून उष्णतेच्या लहरी बाहेर फेकत असते. (अर्थातच् बाहेरील वातावरणाचे तापमान त्या वस्तूच्या तापमानापेक्षा निश्चितच कमी असावे). उदाहरणार्थ, ह्या खोलीत बसून मी हे पुस्तक लिहीत आहे. पुस्तक लिहिता

लिहिता मी उठतो आणि खोलीबाहेर जातो. मी खोलीत असताना माझ्या शरीरातून निघणाऱ्या उष्णतेच्या लहरी अद्यापही तेथे असतात. माझे पूर्ण छायाचित्र घेतले जाते. त्यासाठी बाष्पलेखाचा उपयोग केला जातो. ही युक्ति ब्रिटन व अमेरीका येथे वापरली जाते. ह्या उपकरणात अतिनील किरणांचा (Infra red rays) जे अंधारालाही भेदू शकतात, उपयोग केला जातो, त्यामुळे छायाचित्र दिवसा घ्यावे की रात्री घ्यावे हा प्रश्न उद्‌भवत नाही. मात्र हल्ली वापरात असलेले बाष्पालेख, काही तासांपूर्वीच निर्माण झालेल्या उष्णतालहरींची छायाचित्रे घेऊ शकतात.

काही वर्षांपूर्वी अमेरीकेत, एका रहस्याचा शोध लावण्यासाठी ह्या बाष्पालेखाचा छानच उपयोग करुन घेण्यात आला होता. न्यूयॉर्क शहरावर एक अनोळखी विमान घिरट्या घालताना दिसत होते आणि नंतर ते एकाएकी अदृश्य झाले. विमानतळावरील अधिकाऱ्यांचा संशय वाढला. बाष्पालेखाच्या साहाय्याने त्वरित छायाचित्रे घेण्यात आली. त्यांचा अभ्यास करुन, विमानाचे आकार व आराखडा कसा असेल ह्याची माहिती समजली.

ह्या प्रकाराबाबत भाष्य करताना हिन्दुस्थान टाईम्स पत्राने शेरा मारला की, नजिकच्या भविष्यकाळात आपण आपला इतिहास पडद्यावर पाहू शकतो आणि हे शक्य आहे की, विचित्र घटनांच्या मालिका प्रकाशात येऊन भूतकाळासंबंधी आपल्या संकल्पनामध्ये आमूलाग्र बदल होईल.

ज्याप्रमाणे चलत् चित्रपटाच्या आकर्षक मांडणीवर नायक - नायिकांच्या हालचाली, जलद गतीने फिरणाऱ्या व रेखीव छायाचित्रे काढणाऱ्या, छायाचित्रकाराकरवी बंदिस्त करुन ठेवल्या जातात, त्याप्रमाणे ह्या संशोधनाची अजब प्रगती व त्याचा परिणाम पाहून असे वाटते की वैश्विक स्तरावर आपली प्रत्येक कृती दिसणे सहज शक्य आहे. यामध्ये तुम्ही कोणाला मारले अथवा एखाद्या गरीबाला ओझे उचलून देण्यास मदत केली, चांगल्या कारणाकरिता युद्ध केले किंवा दुष्ट विचारापासून कोणाला तरी परावृत्त केले, तुम्ही प्रकाशात हालचाल करीत असा वा स्वस्थ बसलेले असा, तुमची प्रत्येक कृती वैश्विक पातळीवर नोंदली जाते हे निश्चित. हे नोंद घेण्याचे काम, प्रत्येक घरात, प्रत्येक मिनिटाच्या प्रत्येक सेकंदाला सतत चालू असते. ते कोणी थांबवू शकत नाही.

एकदा एखादी कथा, चलत चित्रपटाच्या रुपाने साकारली, तर ती

पुन्हा रजतपडद्यावर, कितीही दूर अंतरावर आणि कधीही, पुन : पुन्हा पाहाता येते. जणू काही प्रत्यक्ष घटना घडताना पाहणारी व्यक्ति त्या ठिकाणी हजर आहे व त्या ठिकाणी जे जे घडत आहे, ते तसेच प्रत्यक्ष पाहात आहोत असा भास त्यावेळी निर्माण होतो. याच पद्धतीने, प्रत्येक व्यक्तीची ह्या जगातील चांगल्या व वाईट कृतींची नोंद, न्यायदानाच्या दिवशी इतक्या बारकाईने दाखविली जातील की पाहून तो आश्चर्याने चकीत होऊन ओरडेल, हे कसे रेकॉर्ड आहे की ज्याने माझे लहान मोठे कोणतेही कर्म नोंदल्या शिवाय सोडले नाही. (सूरःकहफ – ४९)

वरील संपूर्ण चर्चेवरुन आपल्याला हे कळून चुकले असेल की एकूण एक कृत्यांची, अचूकपणे नोंद केली जाते. मनात येणारा प्रत्येक विचार व आपण उच्चारलेला प्रत्येक शब्द शाश्वतकाळापर्यंत सुरक्षित ठेवला जातो. आपल्या प्रत्येकाच्या मागे एक छायाचित्रकार पाठलाग करीत आहे; ज्यावर दिवस किंवा रात्रीचा कोणताही परिणाम होत नाही व जो जीवनभर अखंडपणे आपले चित्रण करीत असतो.

चुका करीत, बेफामपणाने वाहतुकीच्या कायद्याचा भंग करणाऱ्या चालकाचे, ज्याला हे माहित नसते की, त्याची प्रत्येक हालचाल लघुमंडल दूरचित्रवाणीद्वारा टिपली जात असते, जे भवितव्य होते, त्याचप्रमाणे वरील घटना आहे. दिल्लीमध्ये सन १९८० मध्ये एक तीनचाकी वाहनाचा चालक, आपली स्कूटररिक्क्षा जेथे वाहन उभी करण्याची परवानगी नव्हती अशा ठिकाणी उभी करुन दुसरीकडे निघून गेला होता, त्यावेळी ही पद्धती अगदी नवीनच असल्यामुळे त्याला आपल्यावर कोणी पाळत ठेवत असेल याची सुतराम कल्पना नव्हती. जेव्हा एका पोलिसाने त्याला हटकले तेव्हा त्याने आपण आताच एका उतारुला येथे उतरविले आणि निघून जाण्याच्या तयारीत होतो, असा बहाणा केला. पोलिसाने त्याला लगेच नियंत्रण कक्षात नेले. तेथे एका पोलिस अधिकाऱ्याने त्याला एक लघुपट दाखविला, ज्यामध्ये त्याच्या सर्व हालचाली दिसत होत्या, (मात्र उतारुचा कोठेही पत्ता नव्हता!). त्याचे वाहन तेथे उभे करणे, इकडेतिकडे फिरणे, मित्रांशी गप्पा मारणे, आणि शेवटी पोलिसाबरोबर त्याने दर्शविलेल्या अजाणतेपणाचा संवाद! अर्थातच तो लघुपट पाहून, त्या वाहनाच्या मालकाचा बचावाचा कोणताही युक्तिवाद टिकू शकला नाही.

वैश्विक पातळीवर ह्याच पद्धतीने नोंद होते, फक्त ती असे तुरळक प्रसंग नोंदवन नाही, तर घडाळ्याच्या काट्याप्रमाणे सतत नोंदीची प्रक्रिया चालू असते. आणि नुसत्या बाह्यकृतींची नव्हे तर अंतर्मनात होत असलेल्या प्रतिक्रियांचीसुद्धा अविरत नोंद घेतली जाते. ह्या अद्भुत घटनेच्या हेतुसंबंधी एवढाच खुलासा पुरेसा आहे की, शेवटच्या न्यायदानाच्या दिवशी दैवी न्यायालयात हा पुरावा व्यक्तीच्या बाजूने किंवा विरुद्ध वापरला जाईल. आता इतकी सारी वस्तुस्थिती उघड दिसत असताना जर एखाद्याला त्या अंतिम न्यायदानाच्या दिवशी आपल्याला जाब द्यावा लागणार आहे व त्यातून कोणाचीही सुटका नाही हे उमजले नाही, तर मला हे कळत नाही की अशी कोणती घटना माणसाचे डोळे उघडतील?

## मृत्युनंतरच्या जीवनासंबंधी संकल्पनेची आवश्यकता

सध्याच्या ह्या विश्वरचनेत, मृत्युनंतर जीवन ह्या संकल्पनेच्या आगमनाविषयी, धर्मात सांगितल्याप्रमाणे, आगमन होणार आहे किंवा होण्याची अजिबात शक्यता नाही, याबद्दल निश्चित काय आहे हे ठरविण्या करिता, मागील पानात आपण चर्चा केली. तसे जीवन येणार आहे हे आता स्पष्टपणे मांडण्यात आले आहे. आता आपणास हे पहावयाचे आहे की, सध्याच्या जगात ही संकल्पना आवश्यक आहे की नाही?

सर्वात प्रथम आपण मानसशास्त्रीय दृष्टीकोन विचारात घेऊ, केनिंगहॅम (Kenningham) आपल्या पुस्तकात (Plato's Apology) म्हणतो, मृत्युनंतरचे जीवन आनंदी पण अज्ञेयवादी आहे. हल्लीचे सर्व जडवादी पद्धतीचे विचार करणारे हाच विचार करतात की, सध्याच्या जगापेक्षा वेगळे, ज्यात कोणतेही बंधन राहाणार नाही, कोणतेही कष्ट राहाणार नाहीत, सर्व वातावरण मुक्त राहून स्वप्नपूर्तीचा आनंद घेता येईल, असे जग त्यांना हवे आहे. ते म्हणतात, माणसाच्या मनाच्या ह्या सहजप्रवृत्तीमुळेच वरील प्रकारची दुसऱ्या जगाची कल्पना उदयास आली आहे. ते ठामपणे म्हणतात की, सध्याच्या जगापेक्षा वेगळ्या जगाची कल्पना शुभचिंतनातून आणि काल्पनिक समाधान मिळविण्यासाठी मनसोक्त वागण्याच्या इच्छेपोटी निर्माण झाली आहे. मृत्युनंतर आपल्या स्वप्नातील जगात कोणीतरी नेऊन बसविण्याची कल्पना कोणास आवडणार नाही? त्यांना हे ठाऊक नाही की

वस्तुस्थिती वेगळी आहे. आणि असे जग अस्तित्वात नाही. तरीही, स्वर्ग आहे व मृत्युनंतर स्वर्गात जाण्याची माणसाची तीव्र इच्छा आहे ह्याकडे आपण मानसशास्त्रीय पुराव्याचा एक भाग म्हणून पाहिले पाहिजे, कारण तोच मृत्युनंतरच्या जीवनाचा आधार आहे. अतिशय तहान लागलेली असताना, पाण्याचे अस्तित्व शोधणे यात जसा मनुष्य व पाणी यातील परस्पर संबंध सुचविला जातो, त्याचप्रमाणे चांगल्या जगाची इच्छा हेच दाखवते की असे एखादे जग अस्तित्वात आहे आणि त्याचा आमच्या जीवनाशी प्रत्यक्ष संबंध आहे.

अतिशय पुरातनकाळापासून चांगल्या जगाची, मानावाने वैश्विक पातळीवर इच्छा करावी ह्याला इतिहास साक्षीदार आहे ही वस्तुस्थिती आहे.

आता जे काही काल्पनिक आहे, त्याने इतक्या सर्व माणसांच्या मनावर, शाश्वत काळापासून व विस्तृत प्रमाणावर असा पगडा बसवावा ही खरोखरच विचार करण्याच्या पलीकडील गोष्ट आहे. अशा प्रकारचे चांगले जग अस्तित्वात आहे. ही वस्तुस्थिती अमान्य करणे म्हणजे निव्वळ हेकटपणा आहे.

अशा ह्या प्रबळ मानसशास्त्रीय मागणीकडे त्यांनी दुर्लक्ष का करावे हे मला समजू शकत नाही. मृत्युनंतरचे जीवन ही कल्पना ते केवळ रद्दड म्हणून इतक्या सहजपणाने कशी बाजूला टाकू शकतील? चांगल्या जगाची कल्पना काही ठराविक वस्तुस्थितीचा परिपाक असेल तर, तिचा संबंध माणसाच्या महत्त्वाकांक्षेशी इतका तंतोतंत का जुळावा? हजारो लाखो वर्षांपासून मानवांच्या भावनेशी निगडित असा हा अतूट संबंध दुसऱ्या कोणत्याही गोष्टीशी आलेला आपणास दिसतो काय? मृत्युनंतर आपले जीवन आहे ही कल्पना जेव्हापासून मानव अस्तित्वात आला आहे, तेव्हापासून मानसशास्त्रात अगदी घट्ट रुतून बसली आहे. ही खोटी गैरसमजूत बुद्धिमान परंतु हेकेखोर लोकांकडून टीका करण्याची प्रवृत्ती नसलेल्या सरळ व नि:संशयी मनावर लादली गेली आहे, हे म्हणणे मात्र मान्य होणार नाही.

ह्या जगात माणसाच्या अनेक इच्छा अपूर्ण राहातात. त्याला ह्या जगात अनंत काळपर्यंत राहावेसे वाटते, पण मृत्युमुळे सर्व गोष्टी तशाच थांबतात. एखादा माणूस बुद्धीच्या व ज्ञानाच्या जोरावर यशाच्या गिरिशिखरावर असताना एकाएकी मृत्युमुळे संपावा व आयुष्यातून नाहिसा

व्हावा यासारखी मानवाची दुसरी चेष्टा नसेल. लंडनमध्ये ४५ ते ६५ वयोगटातील यशस्वी व्यापाऱ्यांची ज्यांचे वार्षिक उत्पन्न लाखो रुपयांच्या घरात आहे, पाहाणी करताना असे आढळले की, ऐन उमेदिच्या काळात, एकाएकी त्यांची ह्रदयक्रिया बंद पडते आणि आपला सर्व वाढविलेला, तेजीत असलेला धंदा, मृत्युपत्रान्वये दुसऱ्याला देऊन ते या जगातून निघून जातात. मग त्यानंतर काय? विनवुड रीड्स (Winwood Reads) यावर पुढीलप्रमाणे मत व्यक्त करतो –

आपला सर्वोच्च शक्तिनिशी काही व्यक्तिगत संबंध आहे किंवा कसे अथवा आणखी एखादे जग जर असले तर त्यात आमच्याशी जशास तसे या पद्धतीने कोणी वागणार आहे किंवा कसे ह्यासंबंधी विचार करण्याची पाळी आता आली आहे. हा काही केवळ तात्त्विक प्रश्न आहे असे नव्हे तर आपणासाठी हा प्रायोगिक व अतिशय महत्वाचा प्रश्न आहे. आयुष्य फारच कमी आहे आणि त्यात ही सुखे फारच कमी आहेत. ज्याची आपण अपेक्षा करतो, ते जर जीवनात मिळाले तर आपले जीवन संपावयास हवे. जर कोणी असे दाखवून दिले की, अमुक एक प्रकारे जीवन व्यतीत केल्याने शाश्वत व कायमचा सुखाचा ठेवा हस्तगत होतो तर हे स्पष्टच आहे की, कोणीही उन्मादाने जगणे पसंत करणार नाही किंवा वेडा माणूसच अशा प्रकारचे आयुष्य कंठण्याचे नाकारील.

परंतु हाच लेखक काही क्षुल्लक शंकेवरुन, निसर्गाने केलेले आव्हान नाकारतो.[१]

आता जोपर्यंत आपण बारकाईने निरीक्षण करीत नाही व त्या योजनेला संपूर्ण समजावून घेत नाही, तोपर्यंत हा एक वाजवी सिद्धान्त भासू लागतो. पण जेव्हा आपण वरील गोष्टी करतो, तेव्हा आपण हास्यास्पद ठरतो हे जाणवते व चटकन् सिद्ध होते. मूर्ख लोकांचे आत्मे, जे त्यांच्या पापासाठी जबाबदार नसतात, स्वर्गात जातील व गोएटे (Goethe) किंवा रुसो (Rousseau) यांच्यासारखे नरकात खितपत पडतील. त्यासाठीच मूर्ख म्हणून जन्माला येणे हे गोएटे किंवा रुसो म्हणून जन्माला येण्यापेक्षा अधिक बरे ... आणि हे सर्वच हास्यास्पद आहे.[२]

पण हा नकार म्हणजे मॅस्विलाच्या निष्कर्षास लॉर्ड केल्व्हिनने दिलेल्या नकारासारखाच आहे. लॉर्ड केल्व्हिनचे म्हणणे होते की,

विज्ञानाच्या वैचारिक अधिपत्याखाली जे आहे, त्याचा यांत्रिक पद्धतीने पूर्ण विकास करुन पाहिल्यानंतरच त्याला योग्य ती मान्यता व समजूत तो देईल. त्यामुळेच मॅक्सवेलची चुंबकीय विद्युत शक्तिची तत्त्वप्रणाली त्यास मान्य होऊ शकली नाही. कारण त्याच्या पद्धतीप्रमाणे ती तत्त्वप्रणाली योग्य त्या जडद्रव्याच्या नमुन्यात बसू शकली नाही. आज मात्र अशी गैरसमजूत असणे शास्त्रीय जगतात असमंजसपणाचे लक्षण मानले जाते. जे.डब्लु.एन सुलिवन लिहितो, अखेर निसर्ग म्हणजे एकोणिसाव्या शतकात एखाद्या अभियंत्याने त्याच्या कार्यशाळेत, साच्यात घालून बसवावी अशी वस्तु असलीच पाहिजे असा आग्रह आपण का धरावा ?

अखेरीस विनवुड रीड्सच्या दूसऱ्या जगाच्या बदनामीविषयी भाष्यासंबंधी मी असे म्हणेन, विसाव्या शतकातील तत्त्ववेत्यांना, बाह्या जग, त्यांच्या मर्जीनुसार असावे असे ठरविण्याचा काय अधिकार पोहोचतो ?[१]

विनवुड रीड्स इतकी साधी गोष्ट कधीच समजू शकला नाही की वस्तुस्थिती, बाहेरुन जे चकाकते, त्यावर कधीच अवलंबून नसते. उलटपक्षी बाह्यरचना, चकाकी वस्तुस्थितीवर अवलंबून असते. वस्तुस्थिती काय आहे हे जाणून घेऊन तिचा स्वीकार करण्यातच आमचे यश अवलंबून असते. वस्तुस्थितीकडे डोळेझाक करुन नाकारुन किंवा त्यांच्यापासून दूर पळून यश मिळत नसते. ह्या विश्वाचा कोणीतरी निर्माता म्हणजे ईश्वर आहे व त्याच्यापुढे आम्हाला न्याय मिळविण्यासाठी हजर राहावे लागणार आहे ही जर वस्तुस्थिती आहे तर आमच्यापैकी प्रत्येकाची मग तो रुसो असो वा सामान्य माणूस असो, त्याचे ईश्वरावर विश्वास ठेवणे कर्तव्य होऊन बसते. विनवुड, गोएटे किंवा रुसोने, वस्तुस्थितीपुढे नमावे असे कधीच सांगितले नाही. उलटपक्षी वस्तुस्थितीचा त्यांनी स्वत:हून स्वीकार करावा अशी अपेक्षा केली आणि जेव्हा वस्तुस्थिती त्याच्या कल्पनाशक्तीपेक्षा वेगळी भासू लागली, तेव्हा त्याने वस्तुस्थिती असमंजसपणाची म्हणून नाकारली.

लष्करी गुपिते सुरक्षित ठेवण्याचा कायदा वेडगळपणाचा आहे असे म्हणणे जसे असमंजपणाचे आहे तसेच एखाद्या साध्या शिपायाच्या कामाची भरपूर प्रशंसा करणे हास्यास्पद आहे. विख्यात शास्त्रज्ञ रोझेनबर्ग व त्याची पत्नी ह्यांना रशियास युद्धासंबंधी गुपिते पुरविण्याबाबत दोषी ठरवून विजेच्या खुर्चीवर ठार मारण्यात आले होते. (१९५३). न्याय म्हणजे वस्थुस्थिती आहे

आणि त्यावरच कायदा अवलंबून आहे; मग परिणाम काहीही होवो. त्याचप्रमाणे विश्वव्यापी दैवी योजना ईश्वराच्या न्यायीपणावर अवलंबून आहेत त्या जरी बाह्यात्कारी अप्रिय किंवा सहज समजू शकणाऱ्या अशा असल्या तरी आतून अतिशय स्पष्ट आहेत. पण आपण हे समजून घेतले पाहिजे आणि अंतिम व निर्विवाद वस्तुस्थिती म्हणून मान्य केले पाहिजे.

संपूर्ण जगात एक अगदी छोटी प्रशंसनीय पण अतिशय गर्भितार्थ भरलेली गोष्ट आहे की, माणूस हा एकमेव प्राणी आहे, ज्याला उद्या ह्या संकल्पनेचे भान आहे. भविष्याबद्दल विचार करणारा तो एकमेव प्राणी आहे आणि नुसत्या उज्ज्वल भविष्याची चिंता करणारा नव्हे तर त्याप्रमाणे कृती करणारा आहे. मानवी मेंदूच्या हालचाली अतिशय सूक्ष्म व गुंतागुंतीच्या आहेत; ज्यामध्ये उपजत ज्ञान व प्रेरणा भरपूर आहेत. पशुपक्ष्यांपेक्षा कोणत्याही गोष्टीची आगाऊ तयारी करुन ठेवण्याची त्याची प्रवृत्ती असते. उदाहरणार्थ, मुंग्या हिवाळ्यापूर्वी अन्नाचा साठा करुन ठेवतात किंवा शिंपीण योग्य वेळी आपल्या प्रजोत्पादनासाठी घरटे तयार करुन ठेवते. भविष्याचा विचार करुन ही कार्ये घडत नसतात तर त्यांना त्याचे उपजतच जबरदस्त ज्ञान असते. यात त्यांच्या मनाचा अथवा बुध्दीचा कोणताही सहभाग नसतो. उद्याचे भान ठेवून, त्याचा विचार करुन, त्याचप्रमाणे योजना करुन ठेवणे ह्याला काल्पनिक विचारांची शक्ति लागते, जी मानवाला एकट्यालाच बहाल केलेली नाही.

मानवाच्या जातीत जर 'उद्या'ही संकल्पना नसती तर सामाजिकशास्त्राचा आज जेवढा विकास झाला आहे, तेवढा कधीच झाला नसता. कारण 'उद्या' ही संकल्पना, अधिक सुधारीत व भविष्यकालीन जीवनाशी निगडीत व अतूट संबंध ठेवून आहे. चांगल्या व सुधारित जीवनाची इच्छा म्हणजे सध्याच्या अयशस्वी व दु:खी जीवनाच्या वाईट परिणामापासून दूर पळणे किंवा प्रतिकूल परिस्थितीच्या सामान्यस्थितीपासून दूर जाणे. आणि एकदा का समाजात स्थिरता व भरभराटीचा काळ आला तर ही उत्कंठा आपोआप नाहीशी होते. उदाहरणार्थ, रोमन गुलामांनी ख्रिस्ती धर्माचा विस्तृत प्रमाणावर यासाठीच स्वीकार केला की त्यामध्ये मृत्युनंतरच्या जीवनात त्यांना स्वर्गाचे आशीर्वाद प्राप्त होण्याची आशा होती. जर ते गुलाम नसते तर तेही अनेकेश्वरवादी व मूर्तीपूजक बनले असते. त्यावेळी अशी धारणा होती की

विज्ञानाच्या प्रगतीमुळे मनुष्य आणखी सुखी होईल आणि त्याची अधिक भरभराट झाल्यानंतर शेवटी मृत्युनंतरचे जीवन ही संकल्पना त्याच्या मनातून अपोआप नैसर्गिकरित्या निघून जाईल.

गेल्या चार शतकातील विज्ञान व तंत्रशिक्षणाचा इतिहास पाहाता, वर इच्छिल्याप्रमाणे घडू शकले नाही. भांडवलवादी आर्थिक विचारसरणीने, तंत्रशिक्षणाच्या विकासाशी हात मिळवणी करुन सामान्य माणसावर जी घट्ट पकड बसविली, त्यामुळे खरे कलाकार आणि कारागीर यांची कला लुप्त होऊन ते केवळ यांत्रिकी बनले आणि सामान्य माणसांची सारी संपत्ती, औद्योगिक क्षेत्रातील बड्या माणसांकडे गेली. ज्या माणसांना एकेकाळी आपल्या हातातील कलेबद्दल अभिमान होता, ते केवळ मजूर बनले आणि त्यांच्या स्वत:च्या भवितव्याविषयी कोणतेही नियंत्रण त्यांच्या हाती राहीले नाही, किंवा उज्ज्वल भविष्यकाळ त्यांच्या दृष्टीक्षेपातही आला नाही. भांडवल (कॅपिटल) या ग्रंथात कार्ल मार्क्सने १९व्या व २०व्या शतकात सर्वसामान्य लोकांचे विस्तृत प्रमाणावर किती भयानक शोषण झाले होते याचे चित्रण केले आहे. समाजवाद्यांना जवळजवळ एक शतक याविरुद्ध लढा द्यावा लागला तेव्हा कोठे ती परिस्थिती सुधारली. मात्र त्यामुळे जे काही बदल झाले, ते सर्व बनावट ठरले. पूर्वीच्या मजुरांना  मिळणाऱ्या मजुरीपेक्षा हल्ली मजुरी भरपूर मिळते यात शंका नाही; पण खऱ्याखुऱ्या सुखाची तुलना करता, मजूर अतिशय दरिद्री बनला आहे असेच म्हणावे लागेल. आधुनिक संस्कृती व तंत्रज्ञान माणसाला काही भौतिक बाबतीत निश्चितच चांगले देऊ शकली, पण त्यास कोणतीही मानसिक शांतता लाभू शकली नाही. आधुनिक संस्कृतीचे वर्णन करताना ब्लेकने काढलेले उद्गार योग्यच आहेत:

''मला भेटलेल्या प्रत्येक चेहऱ्यावर एकच खूण, अशक्ततेची, याचनेची' बर्ट्रांड रसेलने स्पष्टपणे म्हटले आहे की, पशुपक्षी जोपर्यंत निरोगी आहेत व त्यांना खाण्यास पुरेसे अन्न आहे तोपर्यंत ते सुखी आहेत. मानवसुद्धा असाच सुखी व्हावा ही अपेक्षा कोणीही करील, परंतु आधुनिक जगात, बहुतांश भागात तो सुखी नाही.

न्युयॉर्क शहराला भेट देणाऱ्या प्रवाशांचे डोळे, एम्पायर स्टेटसारख्या ४०० मीटर उंच इमारती पाहून दिपून जातात. या इमारतीच्या सर्वात वरच्या मजल्यावरील तापमान, तळमजल्याच्या मानाने कितीतरी पटीने कमी असते.

तुम्ही इमारतीवर सर्वात वर जाता आणि पुन्हा खाली येता. पुन्हा वरच्या मजल्याकडे नजर टाकली असता, तुमचा स्वत:वर विश्वास बसत नाही की आपण थेट वरच्या मजल्यावर काही वेळापूर्वी गेलो होतो. कारण ह्या प्रवासाला उद्‌वाहनाद्वारा फक्त ३ मिनिटे लागतात. अशा प्रकारच्या प्रभावशाली इमारती व सुसज्ज झगमगती दुकाने वगैरे पाहून प्रवासी कोणत्याही क्लबमध्ये गेला की तेथे अनेक स्त्री–पुरुष वाद्यांच्या तालावर बेफाम धुंद नृत्ये करीत असतात. काय नशीब काढून आले आहेत लेकाचे! असे उद्गार तो काढतो. परंतु त्याने उच्चारलेले शब्द हवेत विरतात न विरतात तोच, नृत्यमंचकावरुन एक थकलेली तरुणी खाली येते आणि त्याच्या शेजारच्या खुर्चीवर बसते. आपले निळे डोळे रोखून ती प्रश्न विचारते,

माझा चेहरा फारसा सुंदर दिसत नाही का?

आभारी आहे, पण तुला ठाऊक आहे, अलीकडच्या तरुण पोरांनी माझी साथ सोडून दिली आहे; त्यामुळे जीवन इतके उदास झालेय म्हणून सांगू?

आधुनिक जगात माणूस हा पूर्वीच्या 'स्व' ची नुसती छाया बनून राहिला आहे. विज्ञानाची व आधुनिक तंत्रज्ञानाची प्रगतीने भलेही आमच्या राहाणीमानात खूपच भौतिक सुधारणा व ऐषआराम दिला असेल, उदाहरणार्थ, जलद वाहतुकीची साधने, वाचनालये, मनोरंजनाची विविध साधने, इत्यादी इत्यादी. पण खरे सांगायचे तर यामुळेच माणसांच्या मनाची शांती हरवली आहे. मोठमोठे तांत्रिक प्रकल्प उभारले गेले, परंतु येथील कामगारात अस्वस्थता आहे. चारशे वर्षांच्या विज्ञान व तंत्रज्ञानाचा हा दुर्दैवी कळस आहे. मग अशा विज्ञानामुळे व तांत्रिक ज्ञानाद्वारे आम्हाला सुखशांतीचे नवे जग मिळू शकेल या भरवशाने, अनंतकाळापासून आम्ही त्याच्यामागे का बरे भटकतो आहोत?

आता हाच प्रश्न आपण नैतिकतेच्या दृष्टीकोनातून विचारात घेऊ. सध्याच्या जगातील घाणेरड्या व कुजक्या भानगडीकडे पाहून असे वाटते की मृत्युनंतर जीवन अत्यावश्यक आहे. मृत्युनंतरचे जीवन ही संकल्पना मानवाच्या आयुष्यातून वजा करुन टाकली तर संपूर्ण मानवी इतिहास निरर्थक होईल.

माणसाचा स्वभाव असा आहे की, त्याला चांगले व वाईट, न्याय व अन्याय यात फरक करावासा वाटतो. पृथ्वीवर मानवाशिवाय कोणत्याही इतर प्राण्याला हे नीतीचे ज्ञान नाही. तरीही माणसाच्या ह्या जगात, नेमक्या ह्या उपजत ज्ञानाला दाबून टाकले जाते. माणूस माणसाला लुबाडतो, चोरी करतो, छळ करतो, थोडक्यात, माणसावर अनेक प्रकारे आक्रमण करतो. काहीकाही वेळा तर खूनही करुन टाकतो. उलटपक्षी पशुपक्षी अशा प्रकारे स्वजातीची कधीही हत्या करीत नाहीत. लांडगा कधी लांडग्याला खाणार नाही, परंतु माणूस स्वजातीसाठी लांडगाच बनला आहे. अर्थात् निसर्ग मधूनमधून न्यायाचे व सत्याचे दर्शन घडवून आणतो, यात शंकाच नाही. आणि ते फारच प्रशंसनीय आहेत. परंतु मानवी इतिहासातील बहुतांश भाग हा हृदयाचा थरकाप उडविणाऱ्या गोष्टी, अन्याय, लबाडी आणि मानवी हक्कांची पायमल्ली यांनीच भरला आहे. ज्यांनी इतिहासाचा सखोल अभ्यास केला आहे, त्यांचीसुद्धा जीवनातील कठोर वास्तवतेचा आपण मनाशी ज्यांचे आदर्श बाळगलेत त्यांच्याशी तुलना करुन, कोणताही संबंध नसलेला पाहून निराशा झाली आहे. खाली काही प्रसिद्ध तत्त्वचिंतक, इतिहासतज्ज्ञ व साहित्यिकांचे प्रसंगोचित, निरीक्षणात्मक उद्गार दिलेले आहेत.

व्हॉल्टेअर – इतिहास म्हणजे गुन्ह्यांच्या व दुर्दैवांच्या चित्रांशिवाय दुसरे काही नाही.

हर्बर्ट स्पेनर – इतिहास म्हणजे निरर्थक अफवा आहेत.

नेपोलियन – इतिहास म्हणजे अर्थहीन गोष्टींना दिलेले नाव आहे.

एडवर्ड गिबन – इतिहास म्हणजे खरोखर मानवजातीची, गुन्हे, वेडाचार आणि दुर्दैव यांनी भरलेली वही असून दुसरे तिसरे काही नाही.

हेगल – इतिहासाच्या अभ्यासातून शासन व जनता एकच एक गोष्ट शिकले आहेत, ती म्हणजे त्यातून ते काहीच शिकले नाहीत.

जी. बी. शॉ – आपण इतिहासापासून शिकलो ते हेच की इतिहासापासून काहीच शिकलो नाही.

आपण आता स्वत:लाच प्रश्न विचारु शकतो की, मानवजातीचा हा एवढा मोठा पसारा व प्रयोग केवळ भीतीची एक मालिका सादर करण्यासाठी व त्यानंतर संपूर्ण शेवट करुन मोकळे होण्यासाठीच केला असावा काय?

आपला निसर्ग निश्चितच या मताच्या विरुद्ध आहे. मनुष्याच्या मनात कुठेतरी खोलवर रुजलेला न्यायिक विचार आणि मोकळेपणा हेच इच्छितो की, आपल्या या जगाचा कोठेतरी दुसरीकडे शेवट व्हावा. अशी एखादी वेळ यावी की जेव्हा सत्य व खोटेपणा काय असतो, हे सर्वांना कळावे व ज्यांच्यावर आक्रमण झाले, त्यांना त्याची माहिती विचारुन, त्यांनी सहन केलेल्या दु:खाची भरपाई करुन मिळावी. अशा तऱ्हेने काटेकोर न्याय मिळावा ही मानवी स्वभावातील स्वाभाविक इच्छा इतकी दृढमूल आहे की, मानवी इतिहासातून ती वेगळी करताच येणार नाही. माणसाच्या स्वभावातील व प्रत्यक्ष घडणाऱ्या घटनातील ही पोकळी आहे ती भरुन काढणे आवश्यक आहे. काय व्हावयास हवे व काय घडत आहे यातला फरक हेच दाखवितो की, असे काहीतरी वेगळे जीवन असायलाच पाहिजे, जे अजून उमगून येत नाही. ही पोकळी हेच ओरडून सांगत आहे की अद्याप अशी वेळ येणार आहे जेव्हा हे जग पूर्णत्वास जाईल. हार्डीचे तत्त्वज्ञान की जग म्हणजे गुन्ह्यांची जागा व आक्रमण हे लोकांना कसे काय पटते हेच मला उमगत नाही. शिवाय पुन्हा ते जे काही आज नाही ते कधीतरी अस्तित्वात येऊ शकेल ह्यावर विश्वाससुद्धा ठेवायला तयार नाहीत – ह्याची योग्य तर्कमीमांसा शोधलीच पाहिजे.

वृत्तपत्रे वाचताना माझ्या मनात नेहमी दु:खाने उद्भवणारा प्रश्न म्हणजे, जर शेवटचा न्यायदानाचा दिवस नसेल, तर ह्या जुलमी राज्यकर्त्यांना कोण शिक्षा करणार? वृत्तपत्रे, जगात रोज घडणाऱ्या घटनांचा आरसा दाखवितात की, जबरदस्तीने पळवून घेऊन जाणे, खून बेकायदा अंगमस्ती किंवा मारहाण, चोऱ्या, दरवडे, आरोप, प्रत्यारोप आणि कदाचित सर्वांत वाईट म्हणजे स्वत:च्या फायद्याच्या गोष्टींचा उदोउदो. सत्ताधारी कशा रीतीने प्रजेवर आक्रमण करतात आणि तथाकथित राष्ट्रहिताच्या नावाखाली एक राष्ट्र दुसऱ्या राष्ट्राच्या भूभागावर आक्रमण कसे करतात हेच यावरुन दिसून येते. वर्तमानपत्रे, उच्चस्थानी सत्ताग्रहण केलेली माणसे कशा तऱ्हेची नाटके खेळतात व सामान्य माणसाला त्याचे काय परिणाम भोगावे लागतात ह्याचे चित्र स्पष्ट करतात. जातीवर्गाचा विद्रोह, जातीयवादी लढे, निरपराध लोकांची लूट व हत्या, हे सत्तास्थानी बसलेल्यांचा इशाऱ्यावर कसे चालतात याची कल्पनासुद्धा करवत नाही. हिंसाचाराची हीन कृत्ये सर्वसामान्यपणे

नेहमीच होऊ लागली आहेत. जेव्हा एखाद्या नेता किंवा प्रेषित, अखिल मानवजातीच्या शांततेसाठी किंवा कल्याणासाठी काही करु पाहातो तेव्हा ह्या राक्षसी दुष्टकर्मांना इतका ऊत येतो की, त्याच्यापुढे चित्ता, लांडगे, आणि इतर हिंस्त्र पशूसुद्धा तुलनेने दयाळू वाटतात. मोठ्या प्रमाणावर व नियोजनपूर्व अशा गोष्टी नित्य घडत असतात. परंतु तरीही त्यांचा साधा उल्लेख, जगातील कोणत्याही वृत्तपत्रात होत नाही आणि इतिहासात नोंद होण्याची त्यांची संधी खोट्या प्रचाराने सहजपणे हुकते. केवळ लूट, फसवेगिरी, क्रौर्य, हिंसस्त्र आणि चोरी यांची हीन नाट्ये दाखविण्यासाठीच का ह्या जगाची निर्मिती झाली आहे? कारण आक्रमकाला शिक्षा होत नाही किंवा पीडितांची दु:खे कमी होत नाहीत. सत्याला आपण सामोरे जायलाच हवे. सध्याचे जग असे आहे, ज्यात संपूर्ण व अथांग अशी अपूर्णता जाणवते आहे. आपले जग अद्यापही अपूर्ण वाटते आहे. परंतु असे असूनदेखील अशी एक वेळ येणार आहे, जेव्हा हे जग सर्वच दृष्टींनी परिपूर्ण व न्याय्य बनू शकेल.

हीच गोष्ट आपण आता वेगळ्या दृष्टीकोनातून पाहूया. पुरातन काळापासून लोकांना सत्य व न्यायाच्या मार्गावर कायम कसे ठेवावे हा एक प्रश्नच होता. एखादा गट ज्याच्या हातात भरपूर राजकीय सत्ता एकवटली त्याच्याकडून होणाऱ्या शिक्षेच्या भीतीपोटी कोणतीही राक्षसी कृत्ये करावयास एकदम कोणी पुढे येत नाही. परंतु ह्या पद्धतीने जे सत्तेवर असतात, त्यांच्यावर कोणीतरी निर्बंध घालणारा हवाच. असा कोणी नसला तर सत्ताधाऱ्यांना न्याय व सत्याच्या मार्गावरुन चालण्याचे कोण दिग्दर्शन करु शकेल? जरी वेगवेगळे कायदे बनविले, पोलिसदल बनविले तरी हे लोक कायद्याच्या कचाट्यातून सहीसलामत सुटतात कारण कायद्याचे हात त्यांच्यापर्यंत पोहोचू शकत नाहीत व पोलिसदल यांचे काहीच वाईट करु शकत नाही. प्रचंड समूहाला जर कोणी आवाहन केले तरी हे लोक, मग ते आवाहन कितीही चांगल्या प्रकारे प्रसिद्ध केले गेले, तरी प्रतिसाद देत नाहीत. असे लोक, असे लोक म्हणजे ज्या ज्या व्यक्तींनी खोट्या मार्गाने प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षितरित्या अवैध लाभ, कोणत्याही स्वरुपात का होईना मिळविला आहे ते अजिबात प्रतिसाद देत नाहीत. कदाचित सरळसरळ दुर्लक्ष करतात. अथांग आवाहने केवळ अधू कानांसाठीच होते असे दिसून येईल. शिक्षेची भीतीसुद्धा ह्या लोकांना, जे गुन्हे करण्यात आणि लाचलुचपत देण्यात

तरबेज आहेत, वाटत नाही. कारण त्यांना हे ठाऊक आहे की, खोटे बोलणे, लाच देणे, अन्याय वशिलेबाजी आणि यासारखे इतर गैरमार्गांने ते यातून सुटून जाऊ शकतात व ह्यात यशस्वी होतात. वेगवेगळ्या क्लृप्त्या योजण्यात ते इतके तरबेज असतात की, गुन्हेगाराला खटला व शिक्षा यातली खूपच माहिती असते.

जर माणसाला लाचलुचपतीपासून वाचवायचे असेल तर तो हे काम स्वत:च करु शकेल. त्यासाठी मनापासून त्याची स्वत:चीच तयारी लागते. जो प्रामाणिक माणूस आहे त्याला, मृत्युनंतरच्या जीवनात मिळणाऱ्या बक्षिसाच्या विचाराने, त्याचे विचार आणखीनच बळकट होतात; मात्र जो दुबळा व अनैतिक माणूस आहे, तो त्याच्या मृत्युनंतरच्या मिळणाऱ्या शिक्षेच्या भीतीने त्या संकुचित मार्गाकडे ढकलला जातो. अंतर्मनाची ही प्रवृत्ती बाहेरील प्रक्रिया किंवा कृत्रिम उपायांपेक्षा अधिक जबरदस्त असते. कोणी उच्चस्थानांवर असो की नीच (खालच्या) स्थानावर असो, दिवसा असो की रात्री असो, खाजगी असो की सार्वजनिक, प्रत्येकाला हे तत्त्व लागू पडते. ज्या क्षणाला एखाद्याला गांभीर्यपूर्वक जाणीव होईल की आज नाही तर उद्या, केव्हा तरी आपल्याला न्यायदानाच्या शेवटच्या दिवशी, जेव्हा सर्वशक्तिमान ईश्वर जो प्रत्येकावर आपला पहारा ठेवून आहे आणि जो सर्व हालचाली पाहात आहे, त्याच्यापुढे जाब द्यावा लागणार आहे. तत्क्षणी त्याची प्रवृत्ती चांगली व हितकारक कृत्ये करण्याकडे होईल. तो वाईट गोष्टी करण्यापासून परावृत्त होतो. धर्माचा मूलभूत आधार असलेल्या ह्या विश्वासास अनुसरुन सतराव्या शतकाच्या उत्तरार्धातील प्रख्यात न्यायाधिश मॅथ्यू हॅल्स (Mathew Hales) म्हणतो, धर्म म्हणजे एक फसवणूक आहे असे म्हणणे म्हणजे समाजसंस्था ज्यावर सुरक्षित आहे, अशा तत्त्वांना तिलांजली देणे होय.

ह्या दृष्टीकोनातून मृत्युनंतरचे जीवन, ही संकल्पना किती सार्थ आहे! इतकेच काय, जे मृत्युनंतरचे जीवन ह्या संकल्पनेवर गैरसमजूत म्हणून विश्वास ठेवण्यास तयार होत नाहीत व न्यायदानाचा एक दिवस आहे या सत्यास नाकारतात, त्यांनासुद्धा इतिहासातून घेतलेल्या धड्यापासून हे मान्यच करावे लागेल की, जर मृत्युनंतरचे जीवन ही कल्पना मान्य केली नाही तर माणसांसाठी न्याय व शिस्त यावर नियंत्रण करणारी दुसरी कोणतीही शक्ती

अस्तित्वात असणार नाही. विख्यात तत्त्वज्ञ कांट (Immanuek Kant) केवळ पुरेसा पुरावा नाही म्हणून ईश्वराचे अस्तित्व नाकारतो. धर्म हा केवळ तात्त्विक कारणांवर आधारलेला नसावा तर नैतिकतेच्या प्रायोगिक कारणांवर आधारलेला असावा. याचाच अर्थ बायबल किंवा तत्सम ग्रंथांमध्ये नीतीचे पाठ कसे आहेत यापेक्षा नैतिक मूल्ये किती आहेत यावर त्यांची महत्ता दाखविली गेली पाहिजे.

व्हाल्टेअर (Voltaire) सुद्धा अध्यात्मविद्येच्या सत्यतेमध्ये विश्वास ठेवत नव्हता. त्याच्या म्हणण्यानुसार नीतीमत्तेची भावना गृहीत धरण्यासाठी ईश्वर व मृत्युनंतरचे जीवन ह्या दोन्ही संकल्पना अतिशय महत्वाच्या आहेत. त्यांच्यामुळेच नीतीचे चांगले वातावरण निर्माण होण्यास मदत होते. वरील दोन्ही गोष्टींवरील विश्वासाच्या अभावाने, चांगल्या वर्तवणुकीविषयी आमच्या मनात कोणताही आदर राहिला नसता की जेणेकरुन समाजात योग्य नीती-नियमांचे पालन होण्यास अडथळा आला नसता.

ज्यांना मृत्युनंतरचे जीवन म्हणजे केवळ काल्पनिक वाटते, त्यांनी एक क्षणभर थांबून विचार करावा की, आमच्यासाठी ही समजूत एवढी आवश्यक का? अशा तऱ्हेची संकल्पना रुजल्याशिवाय, आम्ही समाजिक नीती-नियमांचा क्रम कसा काय योग्य ठेवू शकू? माणसांच्या विचारसरणीतून ही संकल्पना वगळली तर जीवनातील नीतीमत्तेचा डोलारा कोसळणार नाही काय? एखादी संकल्पना जीवनाशी एवढी निगडित असू शकते काय? विश्वास, वस्तुस्थिती वाटावी अशाप्रकारे जीवनाशी संलग्न असलेली पण प्रत्यक्षात अस्तित्वात नसलेली दुसरी एखादी संकल्पना दिसते असे एक तरी उदाहरण आहे काय? मृत्युनंतर जीवन ही संकल्पना जीवन स्थिर व सुव्यवस्थित ठेवणारी इतकी महत्वाची असावी यावरुन हेच दिसते की ह्या विश्वात हेच फार मोठे सत्य असावे. या दृष्टीकोनातून विचार करता ह्या विश्वाचे हेच फार मोठे सत्य असावे. या दृष्टीकोनातून विचार करता ह्या म्हणण्यात अजिबात अतिशयोक्ती नाही की अनुभवजन्य ज्ञानावर विसंबणाऱ्याची रीत व दृष्टीकोनाचे आदर्श केवळ ह्या संकल्पनेशी सुसंगत आहे.

वेगळ्या दृष्टीकोनातून पाहिले असता मृत्युनंतरचे जीवन हा वैश्विक मागणीचा पारिपाक आहे. मागील प्रकरणात ईश्वराच्या अस्तित्वाबद्दल चर्चा केली होती आणि बुद्धिनिष्ठ व वैज्ञानिक अभ्यासानंतर ह्या विश्वाचा निर्माता व

ते चालविणारा ईश्वरच आहे ही मागणी यातून पुढे आली आहे, हे सिद्ध झाले आहे.

आता, तर असा एखादा ईश्वर अस्तित्वात असला तर मानवजातीशी त्याचा संबंध असल्याचा पुरावा असणे आवाश्यक आहे. परंतु सध्याच्या जगाकडे पाहाता आपल्याला हे मान्यच करावे लागेल की हा संबंध नुसता दर्शनी असून चालणार नाही. आमचे नेते त्याग केल्याच्या स्वभातःच बढाया मारल्या, तरीही ते पुढारी बनतात व ईश्वराच्या सेवकांना हीन समजले जाते; तुच्छ लेखले जाते आणि त्यांच्या कृतींना बेकायदेशिर म्हणून संबोधले जाते. ईश्वराच्या नाराजीचे कोणतेही चिन्ह किंवा अवकाशातून एखादी विध्वसंक गोष्ट अजून आपण अनुभवली नाही. अशी काही माणसे आहेत की जी उपहासाने थट्टा करीत टोमणा मारतात की, आम्ही अवकाशयानात बसून चंद्रापर्यंत गेलो पण रस्त्यात कोठेही ईश्वर आम्हास आढळला नाही! अशा तऱ्हेच्या असंख्य संस्थामध्ये सत्येच्या जोरावर त्यांच्या जडवादाच्या आदर्शपणासाठी पोषक काम होत असते. त्यात त्यांना मदत मिळते. देशात व परदेशात त्यांची प्रशंसा करणारेही खूप आहेत. त्यामुळे ध्येय गाढण्यास कोणत्याही प्रयत्नांची कसूर राहात नाही. याच्याविरुद्ध जे ईश्वराचा व धर्माचा उच्च संदेश अगदी साधेपणाने लोकांना सांगतात, त्यांना शिव्याशाप खावे लागतात, आणि प्रतिगामी व शत्रू म्हणून तत्कालीन तत्त्ववेत्त्यांकडून त्यांची संभावना होते. त्यांच्यावर सामाजिक बहिष्कार टाकला जात नाही एवढेच ते भाग्यवान समजावेत. ईश्वर त्याचा राग कशा प्रकारे प्रकट करतो? राष्ट्राचा उदय व अस्त, क्रांतीकारकांचे तुफानी वादळासारखे येणे व जाणे आणि नैसर्गिक महासंकटांमुळे नित्यनियमाच्या जीवनात येणारी अनियमितता. परंतु एवढे असून सुद्धा ईश्वर आणि मानवजात यात कोठेही सरळ संबंध दिसून येत नाही. मग पुन्हा प्रश्न उद्भवतो की आम्ही ईश्वरावर विश्वास ठेवावा की नाही? जर आम्ही ईश्वरावर विश्वास ठेवला तर मृत्युनंतरच्या जीवनावरसुद्धा विश्वास ठेवणे भाग आहे. याचे अगदी साधे कारण आहे की ज्यामध्ये ईश्वर आणि मानवाचा योग्य संबंध दाखविला आहे अशी दुसरी कोणतीही वस्तुस्थिती कबूल करणे शक्य होत नाही.

डार्विनने विश्वाचा कोणी निर्माता आहे हे मान्य केले परंतु पृथ्वीवरील प्राणीमात्रांच्या जीवनासंबंधी त्याने केलेला खुलासा, निर्माता व त्याने निर्माण

केलेले प्राणीजात यात कोणताही संबंध तो प्रस्थापित करु शकला नाही. त्याच्या खुलाशामध्ये असेसुद्धा सूचित केले नाही की मृत्युनंतर जीवनाशी आवश्यकता आहे किंवा न्यायदानाचा एक शेवटचा दिवस असणार आहे. मला हे खरोखर समजत नाही की डार्विनच्या जैविकशास्त्राच्या खुलाशात तो ही पोकळी कशाने भरुन काढणार होता? या विश्वाला निर्माण करणारा ईश्वर तर असावा परंतु त्याचा माणसाशी काही संबंध नसावा हे कबूल करणे आवश्यक आहे. ईश्वर मानवजातीसमोर कधी प्रत्यक्ष येणार नाही. तार्किकदृष्ट्या हे एवढे प्रचंड विश्व कोणत्याही अज्ञात, सर्वोच्च शक्तीच्या मदतीशिवाय निर्माण झाले व ते एके दिवशी आपोआप नष्ट होणार आहे हे सर्व असंभवनीय व अपूर्ण वाटते.

आमच्या हृदयातून, ज्याप्रमाणे गर्भिणी स्त्रीच्या पोटातील मूल बाहेरच्या जगात येण्यासाठी आतूर झाले असते, त्याप्रमाणे क्रंदन होत आहे की पुनरुत्याराचा दिवस येणार व निश्चितच येणार आहे. तो केव्हाही येऊ शकेल, पण येईल मात्र जरुर!

हा पुनरुत्थानाचा दिवस कधी व कोणत्या वेळेला येणार? असा प्रश्न ते विचारतात. सांगा, माझ्या ईश्वराशिवाय ते कोणालाही ठाऊक नाही. ईश्वरच हे जाणू शकतो की, पुनरुत्थानाचा दिवस कोणता ठरवायचा. स्वर्ग आणि नरकात तो दिवस निर्णायक ठरणार आहे. मात्र अचानक तो दिवस येणार आहे. (कुराण ७:१८७)

## अनुभवजन्य ज्ञानाचा पुरावा

ह्या चर्चेची समाप्ती करताना मृत्युनंतरच्या जीवनासंबंधीच्या संकल्पनेसाठी अनुभवजन्य ज्ञानाचा कोणता पुरावा आपण स्वतःला विचारला पाहिजे. वस्तुतः मृत्युनंतरच्या जीवनाचा सर्वात मोठा पुरावा म्हणजे आपण जे जीवन सध्या जगत आहोत, व ज्यावर आपला विश्वास आहे, तो आहे, भलेही ह्या जीवनात जगत असताना आपला मृत्युनंतरच्या जीवनावर विश्वास नसेल. पण मग आपण त्यावर विश्वास का ठेवू नये? आता हे संयुक्तिक आहे की जर एक जीवन मिळाले आहे, तर दुसरेही का मिळणार नाही? तेही मिळू शकेल. या जीवनाचा जो अनुभव आपण आज घेत

आहोत, तो पुन्हा मिळाला तर त्यात विचित्र वाटण्याचे काही कारण नाही. वस्तुतः सध्याच्या जीवनाची वस्तुस्थिती मान्य करायची पण भविष्यकाळात तिचीच पुनारावृत्ती अमान्य करायची ही काही समर्पक गोष्ट नाही.

सध्याचा मानव स्वत:च इच्छेविरुद्ध गोंधळात सापडला आहे. त्यानेच निर्मिलेले देव (म्हणजे निसर्ग, योगायोग, इ.) काही प्रसंग पुनः एकाच पद्धतीने घडवून आणू शकतात याची खात्री आहे पुन:पुन्हा पण धर्माला अभिप्रेत असलेला देव सध्याचे जग पुन्हा निर्मू शकेल यावर विश्वास नाही. याच्या समर्थनार्थ तो पृथ्वी व तिचे विशेष गुणधर्म केवळ अपघाताने निर्माण झाले हे उत्तर देतो. ह्या विचाराचे सार सांगताना सर जेम्स जीन्स म्हणतो, आपल्या पृथ्वीचा जन्म काही अपघाताने झाला ह्यात आश्चर्य वाटण्यासारखे काही नाही. हे विश्व जर असेच पुढे चालू राहिले तर असे अनेक वैचारिक अपघात घडून येऊ शकतात.

इंद्रियविषयक उत्क्रांतीवादाचा सिद्धांन्त हेच सांगतो की, प्राण्यांच्या सर्व जाती एकाच प्रकारच्या प्राथमिक जातीपासून विकसित झाल्या आहेत. डार्विनच्या म्हणण्यानुसार सध्याचा जिराफ नांवाचा प्राणी पूर्वीच्या एखाद्या चतुष्पाद छोट्या प्राण्याचीच मोठी आवृत्ती आहे. जी दिर्घकालीन विकास होता होता कमीजास्त बदल झाल्यामुळे निर्माण झाली आहे. ह्याबाबत डार्विन म्हणतो, मला त्याबाबत निश्चितच खात्री वाटते की, (जर इच्छिलेली प्रक्रिया दीर्घकाला पर्यंत चालूच राहिली तर) सामान्य लहानग्या चतुष्पाद प्राण्यांचे लांब मानेच्या जिराफात रुपांतर होणे सहज शक्य आहे.

ह्यावरुन असे म्हणता येऊ शकेल की जीवन आणि विश्व यासंबंधी योग्य खुलासा करणाऱ्या व्यक्तीला हे मानावेच लागेल की, ज्या स्थितीमध्ये हे विश्व निर्माण झाले आहे, तशी स्थिती पुन्हा उद्भवली तर हे विश्व पुन्हा ह्याच प्रकारच्या घटनांद्वारे निर्माण होऊ शकेल. किंबहुना हे मान्य करण्याशिवाय त्यांना दुसरा पर्याय नाही. वस्तुस्थिती अशी आहे की बौद्धिकदृष्टया विचार करता सध्याच्या जीवनासारखे पुनश्च जीवन निर्माण होण्याची शक्यता अधिकच बळावते. मग ह्या विश्वाचा निर्माता सध्याच्या विश्वाचा जो निर्माता आहे, मग तो कोणी का असेना, तो ह्या घटना पुन्हा त्याच क्रमाने घडवून विश्व निर्माण करु शकतो; हे मान्य करणे भाग पडते. जर हे आपण नाकारले तर सध्याच्या जीवनाचे अस्तित्वही आपणास नाकारावे लागेल. जर आपण

प्रथमत: ह्या विश्वाचे अस्तित्व मान्य केले तर मृत्युनंतरच्या दुसऱ्या जीवनासंबंधी नाकारण्याचा कोणताही अधिकार आपणास राहात नाही.

वरील सर्व चर्चेमधून मानसशास्त्रीय चिकित्सा करताना असे दाखविले गेले की माणसाच्या स्मृतीपेशींमधील विचार मेंदूच्या अंतर्मनात अनंत काळपर्यंत तसेच कायम ठेवले जातात. ह्यावरुन असे पेशींच्या बदलण्याच्या स्वरुपावरुन बदलत जातो म्हणून मानवी मन हे त्या शरीराचा भाग होऊ शकत नाही. शंभर वर्षे जरी उलटली तरी एखादी घटना आपल्याला अचूकपणे जशी सुस्पष्टपणे अंतर्मनात नोंदवून ठेवल्यामुळे आठवते, ह्यावरुन हे अनुमान काढणे शक्य आहे. जर मन हे शरीराचाच एक भाग असते तर त्याचे नेमके स्थान कोणते? शरीराच्या कोणत्या अवयवाशी ते संलग्न असते? आणि जेव्हा शरीराचा एक एक अवयव पेशीस्वरुपात बदलला जातो तेव्हा ह्या स्मृती कोठे जातात? त्या नष्ट का होत नाहीत? ज्या तबकडीवर हे सर्व नोंदले जाते, ती तबकडी फुटून चक्काचूर झाली तरी ह्या स्मृती नष्ट का होत नाहीत? मानसशास्त्राची ही प्रगत अभ्यासावस्था हे दाखवून देते की माणसाचे अस्तित्व म्हणजे त्याचे पेशीमय शरीर, जे झिजते व नष्ट होते, मुळीच संभवत नाही. उलटपक्षी शरीरापेक्षाही वेगळे असे काही तरी आहे जे शरीराबरोबर मृत्युमुळे अथवा झिजल्यामुळे नष्ट तर होत नाहीच तर ते स्थिर व स्वतंत्र अस्तित्वाचे असून त्याचे सातत्य अखंडित असते.

सध्याच्या जीवनाचा विचार करता जागृत मनाकडून होणाऱ्या सर्व हालचाली काळ आणि अवकाश यांच्या नियमांना धरुन होत असतात. मृत्युनंतरच्या जगात जर ते असेलच तर यात अधिक्षेप होऊ शकत नाही. फ्रेडच्या सिद्धान्तानुसार आपले या नियमांनी मुक्त असे बौद्धिक जीवन मृत्युनंतरही सुरुच असते आणि मृत्युनंतरही ते जीवन आपण जगू शकतो. आपले मरण हे काळ व अवकाश यांच्या नियमांनी बद्ध असे तार्किक मरण असते. आपले खरेखुरे अस्तित्व फ्रेडच्या भाषेत बोलायचे तर आपले अंतर्मन हे ह्या नियमांनी संपूर्णपणे मुक्त असते. म्हणूनच मृत्युचा त्यावर कोणताही परिणाम होत नाही. मृत्यु फक्त आपले पार्थिव शरीर नष्ट करु शकतो.

अंतर्मन जे वस्तुतः सत्य आहे शरीर नष्ट झाले तरी शिल्लक राहाते. समजा माझ्या आयुष्यात पंचवीस वर्षांपूर्वी काही घटना घडली असेल किंवा काही विचार मनात आला असेल आणि नंतर ती घटना किंवा विचार पूर्णपणे

विसरुन गेलो असेन. परंतु एकेदिवशी ते सर्व काही मला स्वच्छ आठवू लागते. ती घटना संपूर्ण आठवते किंवा तिचे स्वप्न पडते. याबद्दल मानसशास्त्रज्ञ खुलासा करतात की माझ्या अंतर्मनात हे सर्व विचार अगदी सुरक्षित जपून ठेवले जातात. येथे हा प्रश्न उत्पन्न होतो की स्मृती कोठे राहतात? ज्याप्रमाणे ध्वनीलेखन यंत्राच्या (ग्रामोफोन) तबकडीवर आवाज नोंदवून ठेवला जातो, त्याप्रमाणे जर स्मृती पेशीजालावर कोरुन ठेवली आहे असे म्हणावे तर त्या पेशीसुद्धा शाश्वत राहात नाहीत. कारण घटना घडतेवेळी असलेल्या पेशी पुन्हा घटना आठवण्याच्या वेळेपर्यंत शाश्वत राहात नाहीत; त्या भंग पावून त्यांचे अस्तित्व नष्ट झालेले असते. मग माझ्या शरीरात ही अंतर्मनाची नोंद कोठल्या भागात केली जाते?

हा अनुभवजन्य ज्ञानाचा अगदी सबळ पुरावा आहे; जो हे दाखवतो की दृश्य व पार्थिव शरीर सोडता अदृश्य असे अपार्थिव अस्तित्व आहे जो शरीराला झालेल्या मृत्युमुळे नष्ट होत नाही.

मानसशास्त्रातील संशोधनाद्वारे-आधुनिक मानसशास्त्राची मानवाच्या अंगच्या सर्वोच्च गुणांचा अनुभवजन्य पुराव्यांचा अभ्यास करणारी एक शाखा मृत्युनंतर जीवन आहे हे केवळ निरीक्षणाने सिद्ध करुन दाखविते. त्यातही गमतीची गोष्ट अशी की ह्या संशोधनाचे केवळ अवशेष राहिले आहेत हेच सिद्ध होत नाही तर आपल्या हल्लीच्या जीवनात ज्या व्यक्तिमत्वाच्या स्वरुपात आम्ही वावरतो ते आमचे मृत्युपूर्वीचे अस्तित्व व जीवन आम्हास पहावयास मिळते.

अशा प्रकारचे संशोधन करणारी संस्था १८४२ मध्ये इंग्लंड देशात प्रथम स्थापन करणात आली. ती आजही मानसिक संशोधन करणारी संस्था म्हणून अस्तित्वात आहे. १८८९ मध्ये ह्या संस्थेने मोठ्या प्रमाणावर म्हणजे सुमारे १७ हजार व्यक्तींशी संपर्क साधून चौकशी केली; आणि त्यावरुन अभ्यास करुन ह्या क्षेत्रात बरीचशी माहिती मिळविली. इतर देशांत सुद्धा अशा प्रकारचा अभ्यास करण्यात आला, प्रयोग करण्यात आले, प्रात्यक्षिके घडविण्यात आली. आणि असे दाखवून देण्यात आले की पार्थिव शरीर मृत्युने नष्ट झाले तरी मानवी व्यक्तीमत्व काही तरी गूढ स्वरुपात राहात असावे. एफ. डब्लु. एच. मियर्सचे पुस्तक मानवी व्यक्तीमत्व व पार्थीव शरीराचा मृत्युपासून बचावयात म्हटले आहे की, मिसुरी (अमेरीका) येथील

सेंट जोसेफ हॉटेलमध्ये एक प्रवासी प्रतिनिधी मालाची मागणी नोंदवून घेत असताना एकाएकी त्याला जाणवले की त्याच्या उजवीकडे कोणीतरी बसले आहे. चटकन् त्याने वळून पाहिले असता त्याला नऊ वर्षांपुर्वी मृत झालेली आपली बहीण बसलेली दिसली. नंतर थोड्यावेळाने त्याच्या बहिणीची प्रतिमा नष्ट झाली. याप्रकाराने तो इतका अस्वस्थ झाला की पुढील प्रवास करण्याचे रद्द करुन त्याने स्वगृही म्हणजे सेंट लुईसला जाणारी पहिलीच गाडी पकडली व घरी जाऊन नातेवाईकांना संपूर्ण घटना त्याने सांगितली. तो जेव्हा सर्व हकीगत सांगतासांगता आपल्या बहिणीच्या तोंडावर लाल रंगाचा ओरखडा पाहिल्याचे सांगू लागला, त्यावेळी त्याची आई थरथर कापत उभी राहिली. तिने कबूल केले की तिची मुलगी मरण पावल्यानंतर अपघाताने तिनेच तिच्या गालावर ओरबडले होते. नंतर पुन्हा दु:खाने पश्चाताप पावून तो ओरखडा लपविण्याकरता तिने चेहऱ्यावर पावडर लावली ही घटना तिने घरातील कोणालाही सांगितली नव्हती.

मृत्युनंतरही मानवी व्यक्तीमत्व टिकून राहाते हे सिद्ध करणाऱ्या अशाच घटना आजतागायत नोंदल्या गेल्या आहेत. ह्या सर्व घटना केवळ भ्रामक असतील म्हणून आपण त्याकडे दुर्लक्ष करु शकत नाहीत. मुलीच्या गालावरील ओरखडा केवळ तिच्या आईलाच ठाऊक होता. ह्याच घटनेचा विचार करा. ह्या दोघांशिवाय तिसऱ्या व्यक्तीला तिची गंधवार्ताही नव्हती. अशा प्रकारच्या घटना युरोप-अमेरीका या देशांपुरत्या मर्यादित आहेत असे नव्हे. तर उत्तरार्धातील पुष्कळसे संशोधन ह्याच खंडात झाले आहे; म्हणून त्यांचा संदर्भ घेऊन अधिकाधीक कसुन निष्कर्ष काढून आम्ही उपकृत होत असतो. आपल्या देशातील लोकांनी सुद्धा अधिक प्रकाणावर याबाबतीत पुढे येऊन खूप संशोधन करुन दाखविले तर येणारे निष्कर्ष हे अगदी तंतोतंत व सर्व शास्त्रीय कसोट्यांवर घासूनपुसून सिद्ध होतील.

सी.जे. दुकास (C. J. Duccasse ) आणखी एका वेगळ्याच प्रकारच्या घटनेसंबंधी लिहितो.

काही अशा प्रकारच्या घटना आहेत ज्या जीवन-मृत्यु संबंधात अनुभवजन्य पुराव्यावर आधारलेल्या असतात व त्या ज्यांच्याबाबतीत घडतात त्या लोकांकडून घडत असतात. अशा काही व्यक्ती मग त्या स्त्री असोत वा पुरुष असोत, ज्यांच्याकडून काही क्रिया जागृत मनास ठाऊक न

पडता घडत असतात.

उदाहरणार्थ जागृत मनाला जागृतावस्थातेत ठाऊक नसलेले शब्द बोलणे किंवा लिहिणे, त्यावेळी हे जे बोलले किंवा लिहिले जाते ते जणू दुसऱ्या कोणा व्यक्तीकडून होत आहे असा भास होत असतो. असे लोक वेगळ्याच तंद्रित असतात. आणि पुष्कळशा प्रकारात असे दिसून येते की ती व्यक्ती कुणाशी तरी गप्पा मारीत असेल पण हातात पेन्सिल घेऊन दुसरे वेगळे काहीतरी लिहीत असेल. हा मजकूर सुद्धा लिहून झाल्यानंतर स्वत: वाचून पहात नाही तोपर्यंत त्याला समजू शकत नाही त्याने काय लिहिले आहे ते! जणू काही ह्या वेळेला त्याच्या शरीरात दुसरा कोणीतरी प्रवेश करुन त्याच्याद्वारे मजकूर लिहवून घेतला जात असतो. अशा तऱ्हेचा संपर्क साधारणपणे प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षरित्या कोणत्यातरी अदृश्य शक्तीद्वारे ज्याचे अशा माणसावर नियंत्रण असते, मृत व्यक्तीकडून पण ज्याचे चैतन्य अजून शिल्लक आहे, होत असते. ह्या संपर्काचे अनेक पुरावे मिळू शकतात, अनेक प्रकार संभवतात. उदाहरणार्थ एखाद्याने त्याच्या भावाशी तिसऱ्याच व्यक्तीद्वार अथवा दूरध्वनीने संपर्क साधला असेल तर त्याची ओळख पटू शकते.[१]

तत्कालीन तत्वचिंतक हा मानसशास्त्रीय पुरावा स्वीकार करण्यास का नाकारतात. सी. डी. ब्रॉड (C.D. Brod) लिहितो–

मानसशास्त्रीय संशोधनातील वादग्रस्त मुद्दे सोडून दिले तरी विज्ञानाच्या कोणत्यातरी शाखेला मृत्युनंतर जीवन असते याबाबत अद्याप दुरान्वयाने सुद्धा काहीही सिद्ध करता आलेले नाही.[११]

विचार करणे ही एक संशयास्पद घटना आहे, हे म्हणणे जसे संयुक्तिक होत नाही तसे वरील प्रकारचे मत आहे. कारण एक माणूस सोडला तर विश्वातील अशी कोणतीही घटना किंवा निरीक्षण नाही, ज्याची आपण विचाराने परीक्षा घेतली नाही. मृत्युनंतरचे जीवन अथवा नायनाट हा पूर्णपणे मानसिक प्रश्न आहे. त्यामुळे त्याच्या बाजूने किंवा विरुद्धचा पुरावा हा मानसशास्त्रीय स्वरुपाचाच असला पाहिजे. त्यामुळे विज्ञानाच्या इतर कोणत्याही शाखेकडून सिद्ध होण्याची अपेक्षा करणे म्हणजे मानवाला जन्मत: लाभलेल्या विचार करण्याच्या शक्तीसंबंधी वनस्पतीशास्त्र किंवा धातुशास्त्राच्या अभ्यासाकडे वळणे होय. इतकेच काय, शरीराच्या

कोणत्याही अवयवांचा अभ्यास करुनसुद्धा वरील घटनेसंबंधी होकारार्थी अगर नकारार्थी पुरावा आधार होत नाही. कारण मृत्युनंतरचे जीवन ह्या तत्वाच्या सिद्धतेला सध्याच्या पार्थीव शरीराचा काहीही उपयोग नाही. तर त्यातील चैतन्य उपयोगाचे आहे, ज्याचा निवास शरीरात असतो. पण तरीही जे शरीरापेक्षा वेगळे, स्वतंत्र अस्तित्व असलेले आहे.

इतर अनेक बुद्धीमंत ज्यांनी मानसशास्त्रीय संशोधनाने सादर केलेले पुरावे हेतूपूर्वक तपासले, त्यांना मृत्युनंतरच्या जीवनासंबंधीची वस्तुस्थिती मान्य करणे भाग पडले आहे. ब्राऊन विद्यापीठातील मानसशास्त्राचा प्राध्यापक सी. जे. दुकास याने तात्त्विक व मानसशास्त्रातील अशा दोन्ही दृष्टीकोनातून या संकल्पनेचे पृथःकरण केले. ज्या स्वरुपात धर्मातर्फे ही संकल्पना सादर केली जाते ते स्वरुप त्यास मान्य नाही. परंतु तरीही धर्माची प्रमाण वचने सोडता असे काही पुरावे उपलब्ध आहेत, ज्यामुळे आपल्याला मृत्युनंतर जीवन आहेत हे मान्य करणे भाग पडते, असे तो मानतो. मानसशास्त्रीय संशोधनाच्या सर्वसामान्य पाहाणीनंतर त्याने असे पाहिले–

काही काही प्रकरणात अतिशय बारीकसारीक गोष्टींवर लक्ष ठेवणारी व बहुश्रुत अशा विद्वानांनी अनेक वर्षे अतिशय उच्च पातळीवर ह्या प्रश्नाचा अभ्यास करुन असे निष्कर्ष काढले आहेत की, जीवनाचे गृहित म्हणजे केवळ देखावा ठरला आहे.

अशा विद्वानांमध्ये आल्फ्रेड रसेल वॅसेल, सर विल्यम क्रुक्स, एफ. डब्लु. एच. मियर्स, सिझर्स लोंब्रोझो, कॅमिली फ्लॅमिरॉन, सर ओलिव्हर लॉज, डॉ. रिचर्ड हॉडग्सन, मिसेस हेन्री सिडग्विक आणि प्रो. हिस्लॉप यांसारख्या कितीतरी अनेक विद्वानांची नावे सांगावीत. ह्या सर्व विद्वानांना मृत्युनंतर जीवन असते ही संकल्पना किमान धार्मिक विश्वास म्हणून मान्य आहे. यातून हेच सिद्ध होते की कल्पना खरी तर आहेच परंतु कदाचित अनुभवजन्य पुरावा म्हणून सुद्धा स्वीकृत आहे. जर तसे आहे तर मृत्युनंतरच्या जीवनाच्या चिकित्सेच्या संशोधनाऐवजी ह्या संबंधात प्रत्यक्ष घडलेल्या घटनांची माहिती मिळविणे गरजेचे आहे. आणि अशा प्रकरणांतून गोळा होणारी माहिती धर्माची कार्ये करण्यात अतिशय उपयुक्त ठरली आहेत; नव्हे, ती आपोआप होत असतात.

मृत्युनंतर जीवन असते ही वस्तुस्थिती मान्य करण्याकरिता इतका

पंक्तीप्रपंच करावा लागला. यावरुन ह्या घटनेचे धार्मिक स्वरुप लक्षात घेता ती अमान्य करणे फारच धाडसाचे आहे. ज्याप्रमाणे हजारो किलोमीटर अंतरावर दोन व्यक्तींमधील संवाद दूरध्वनीद्वारे झाला हे मान्य करणे, वाळवंटात हजारो मैल दूर राहणाऱ्या खेडुताला कठीण जाते, त्याप्रमाणे हे आहे. इतकेच काय, अतिशय दूर प्रांतात राहणाऱ्या त्याच्या नातेवाईकाचा दूरध्वनीने त्याच्याशी संबंध जोडून त्या खेडूताच्या हाती फोन दिला तरी तो हेच म्हणेल, अहो, हा काही माझा नातेवाईक तिकडून बोलत नाही, तर मी या यंत्राशी बोलतोय! तुम्ही घोड्याला पाणवठ्यावर किंवा तलावाजवळ नेऊ शकता, परंतु त्याला पाणी पाजू शकत नाहीत.



# THE QURAN

A book which brings glad tidings to mankind along with divine admonition, stresses the importance of man's discovery of truth on both spiritual and intellectual planes. The main themes of the Quran are enlightenment, closeness to God, peace and spirituality. The objective of the Quran is to make man aware of the Creation Plan of God.

## Available in different languages
## Easy to understand













































# मौलाना वहीदुद्दीन खान यांच्या मराठी पुस्तकांचे भाषांतर



















Born in 1925, in Azamgarh, Uttar Pradesh, is an Islamic spiritual scholar who is well-versed in both classical islamic learning and modern disciplines. The mission of his life has been the establishment of worldwide peace. He has received the Padma Bhushan, the Demiurgus Peace International Award and Sayyidina Imam-Al-Hassan Peace Award for promoting peace in Muslim societies. He has been called 'Islam's spiritual ambassador to the world and is recognized as one of it's most influential Muslims. His books have been translated into sixteen languages and are part of university curricula in six countries. He is the founder of the Centre for peace and Spirituality based in New Delhi.

वरील सर्व पुस्तिका खालील पत्त्यावर मिळतील

अब्दुस समद खलिल अहेमद
१०५०, रविवार पेठ, पुणे - ४११००२.
फोन नं. : 020-24472830 मोबा. नं.: 9665059035